**श्रीरामायणसमालोचना** हा ग्रंथ शके १८४९ या वर्षी प्रसिद्ध झाला. या ग्रंथांतील "स्थलनिर्णय" म्हणून एक स्वतंत्र प्रकरण असून त्यांत सध्याचें "सिंहल-द्वीप" हेंच रामायणांतील "लंका" असल्याविषयीं निर्णय घेतलेला आहे. "रामायण आणि लंका" हा न्यायमूर्ति ऐयर यांचा ग्रंथ शके १८६२ (इ स. १९४०) मध्यें प्रसिद्ध झाला. अर्थात् त्यांतील कल्पने विषयीं विवेचन समालोचनेंत येणें शक्य नव्हतें. नंतरच्या कालांतहि त्या ग्रंथाकडे माझें लक्ष जाण्याचा संभव नव्हता हेंहि येथें सांगणें अवश्य आहे. एक तर ग्रंथ इंग्रजींत व तोहि म्हैसूरसारख्या दूरच्या स्थळीं प्रसिद्ध झालेला. यामुळें तो माझ्या वाचनांत सहजगत्या कसा येणार! परंतु शके १८६३ या वर्षी पुणें येथें गेल्यावेळीं "केसरी"चे त्या वेळचे संपादक श्रीयुत जनार्दन सखाराम (तात्यासाहेब) करंदीकर यांनीं त्या ग्रंथाची प्रत "केसरी"कडे आलेली पाहण्यासाठीं मला दिली व ती वाचून पाहून आपलें मत काय तें लोकांपुढें येऊं द्या असें सांगितलें. म्हणजे प्रस्तुतचा परीक्षणात्मक प्रबंध त्यांच्या प्रेरणेनें मी लिहिला आहे हें वाचकांचे लक्षांत येईल. मूळ लेख

त्याच वर्षी पुण्याहून आल्यावर लिहिला, म्हणजे तो लिहून झाल्याला आतां आठ वर्षें इतका काल लोटला आहे. न्यायमूर्ति ऐयर यांच्या कल्पनेचा पुरस्कार दिल्लीचे पंडित हरदत्तशर्मा व पुणें येथील डॉक्टर नरहर गोपाल सरदेसाई यांनीं केला होता व तसा उल्लेख या प्रबंधाच्या पहिल्या प्रकरणांत आला आहे. ज्या कालीं मूळ लेख लिहिला त्या कालास अनुसरून त्या प्रकरणांतील काल-निर्देश आहेत हें येथें वाचकांस सुचविणें अवश्य आहे. न्यायमूर्ति ऐयर यांची कल्पना उचलून धरणारे वरील दोनहि पंडित सध्या विद्यमान नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

लेख लिहून झाल्यावर त्याचें हस्तलिखित श्रीयुत आत्यासाहेब करंदीकर यांजकडे मी पाठविलें; व तें त्यांनीं वाचून पाहिलें. लेख लहानसर असता तर त्याला 'केसरींत' स्थान मिळालें असतें व तो वाचकांपुढें वेळीं आला असता हें खरें आहे; पण "केसरी"त स्थान मिळण्या-करितां तो सुटसुटीत करावयाचा म्हणजे न्यायमूर्ति ऐयर यांची कल्पना निराधार म्हणून अमान्य असल्याचा उल्लेख करण्यापलिकडे कांहीं लिहितां येण्यासारखें नव्हतें व नाहीं. आणि संशोधक वाचकांचें तेवढ्यानें समाधान होईल असें मला वाटत नाहीं. अशा लेखांचें प्रकाशन

करण्याचें साधन म्हणजे एकादें मासिक गांठणें हें होय. असल्या लिखाणाला वाहिलेलें मासिक मराठींत नाहीं व जीं आहेत त्यांना असले प्रबंध प्रकाशित करण्याला अवकाश नाहीं. " पराग " मासिकाचे संपादकांनीं हा प्रबंध प्रकाशित करण्याचें मनावर घेतलें; त्यामुळें तो आतां वाचकांपुढें ठेवतां येत आहे. म्हणजे य संबंधें मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानितों, आणि वाचकांनीं आभार मानावयाचे झाले तर ते त्यांचे मानावयाचे आहेत असेंहि सुचवून ठेवितों.

प्रस्तुत प्रबंध लिहून झाल्यावर तो वाचकांपुढें सध्या येत आहे. यामधील कालांत या विषयाला चालना विहार-प्रांताधिपति विद्वान् महाशय नामदार माधवरावजी अणे यांनीं दिली आहे. " प्रस्तुतचें सिंहलद्वीप हीच प्राचीन लंका " असल्याविषयीं त्यांचें एक व्याख्यान दरभंगा येथें प्राच्यविद्यापरिषदेचें अधिवेशन १५।१०।४८ या दिवशीं भरलें असतां त्यापुढें झालें. त्याचा "केसरी"च्या ४।१।४९ च्या अंकांत प्रसिद्ध झालेला संक्षिप्त अनुवाद वाचकाचे लक्षांत असेलच. या व्याख्यानांत त्यांनीं कांहीं भौगोलिक व कांहीं लोकांतील प्रचलित समजुती ( त्यांना तेथें असतांना आढळून आलेल्या ) त्यांनीं याविषयीं प्रमाण म्हणून दिल्या आहेत. या प्रबंधाला त्या व्याख्या-

नानें पुष्टि मिळत असून जिज्ञासूंनीं तें व्याख्यान या प्रबंधाबरोबर अवश्य वाचावें अशी विनंति आहे.

आस्ट्रेलियांत लंका असल्याची कल्पना नडियाद येथील एका गृहस्थांनीं मध्यंतरी रामचरित मानस म्हणून एक प्रबंध लिहून वाचकांपुढें ठेविली आहे. पण लंकेचें स्थान आतां अनिर्णित राहिलें आहे असें आम्हांला वाटत नाहीं व यासाठीं या कल्पनेविषयीं आतां स्वतंत्र विचार करण्याचें कारण नाहीं.

शके १८७१
बलिप्रतिपद् शनिवार. महाराष्ट्रीय

# रामायण आणि लंका

## ( परीक्षण ले० महाराष्ट्रीय ) 774

### लेखांक १ ला

### परिचय व पुरस्कार

"रामायण आणि लंका" हा प्रबंध बंगलोरचे न्याय मंदिरांतील न्यायाधीश न्या. प. टी. परमशिव अय्यर यानीं लिहिला असून तो त्यांनीच गतवर्षी प्रसिद्ध केला आहे. मद्रास येथील मुख्य न्याय मंदीरातील प्रख्यात न्यायाधीश कै. टी. सदाशिव अय्यर यांचे, लेखक हे कनिष्ठ बंधु होत. या प्रबंधाची पृष्ठें १५२ असून सुमारे ४० पृष्ठें प्रस्तावना आहे. प्रबंधाचे दोन खंड केलेले असून प्रथम खंडांत लंकाविषयक विवेचन आलें आहे आणि तेंच या प्रबंधाचा प्रतिपाद्य विषय होय. द्वितीय खंडांत रामायण वाचतांना उद्भवणारे कित्येक विषय विवेचिले आहेत. प्रबंधाचे या स्वरूपावरून रामायणावर हा एक परीक्षणात्मक प्रबंध असावा अशी आपली कल्पना होते व ती एका अर्थी खरी आहे; तथापि रामायणाचें परीक्षण करण्याचा हा प्रबंध लिहिण्यांत लेखकाचा हेतु नसून रामायणांतील लंकेचें स्थान निश्चित करण्या करितां तो लिहिण्यांत आला आहे असें प्रस्तावना व प्रबंधाचें नामकरण यांवरून दिसून येतें आणि प्रबं-

घाचा प्रतिपाद्य विषय तो असल्याचें आम्हीं त्यावरून वर लिहिलें आहे. लंकास्थान निश्चित करण्याचा प्रयत्न करीत असतां अनुषंगानें इतर स्थानांचा निश्चय करणें क्रमप्राप्त असून तसा प्रयत्न लेखकानें केला आहे व हें सर्व विवेचन प्रथम खंडांत आलें आहे. प्रथम खंडांतील विवेचनास अनुसरून त्या खंडाला भौगोलिक विवेचन असें लेखकानें अन्वर्थक नांव दिलें आहे. तथापि मुख्य हेतु लंकास्थान निश्चित करण्याचा असून प्रबंधाचे नांवांत तो व्यक्त होत आहे.

हिंदुस्थानचे दक्षिणेला असलेलें सीलोन बेट हीच रामायणांतील रावणाची लंका असल्याविषयीं लोकांत समजूत आहे, व ती दहाव्या शतका पासून म्हणजे सुमारें-एक हजार वर्षे प्रचलित असल्याचें लेखकानें स्वतां मान्य केलें आहे. लोकांतील ही समजूत निराधार व चुकीची असून खरी लंका जबलपुरचे उत्तरेला सुमारें पंधरा मैलांवर असल्याचें लेखकानें या प्रबंधांत प्रतीपादिलें आहे. वनवासव्रताचे निमित्तानें दंडकारण्यांत. रामाला वास करावा लागला परंतु रावणानें सीतेचा अपहार केल्यामुळें तिला शोधून परत आणण्यास्तव त्याला लंके पर्यंत प्रवास करावा लागला. रामाचा दंडकारण्यांत प्रवेश होईपर्यंतचीं जीं स्थानें रामायणांत सांगितलीं आहेत त्यां विषयीं प्रायः कोणाचा मतभेद नाहीं. पंचवटीसंबंधानें मागें मोठा वाद झाल्याचें लोकांत प्रसिद्ध आहे. तथापि पंचवटी गोदावरीचे उगमाशीं का मुखाशीं ? अशा प्रकारचें त्या वादाचें स्वरूप असल्यामुळें दोन स्थानांमध्यें सबंध गोदावरी

नदी इतकें प्रचंड अंतर असलें तरी गोदावरीनदीचें अधिष्ठान उभयपक्षीयांना सारखें मान्य असल्यानें व त्यानिमित्त इतर स्थानांत बदल होत नसल्यानें तो वाद आतां आंतल्या आंत जिरल्या सारखा झाला आहे. अय्यर यांनीं लंकास्थान जेथें निश्चित केलें आहे तें नर्मदेच्या उत्तरेला आहे. यामुळें पंचवटी पासून लंके पर्यंत सर्वच स्थानें त्यांना निश्चित करावीं लागलीं व तशीं तीं त्यांनीं केली आहेत. हीं स्थानें अर्थात् लौकिक समजुतीहून अगदीं वेगळीं आहेत. श्रीमंत किबेसाहेबांनीं मागें असा प्रयत्न करून लंकेचें स्थान रेवा संस्थानचे बंडवगड परगण्यांत ठरविलें आहे. अय्यर यांचें लंकेचें स्थान वेगळें व तेथून दूर आहे व त्यांनीं दिलेलीं प्रमाणेंहि अगदीं भिन्न आहेत. श्री. किबेसाहेबांचे लंका विषयक कल्पनेचें खंडन रामायणसमालोचनेच्या द्वितीय खंडामध्यें आम्हीं केलें आहे. अय्यर यांचा प्रयत्न त्याहून वेगळा व स्वतंत्र असून त्यांनीं त्या विषयीं परिश्रम अतिशय केले आहेत. त्यांच्या प्रयत्नाचा विशेष हा आहे कीं रामाचे प्रवासांतील सर्वस्थानें कोठें आहेत हें त्यांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला आहे व तीं रामायणांतील वर्णनांशीं कशीं जमतात हें स्थलीं स्थलीं मूळग्रंथांतील अवतरणें अथवा संदर्भ देऊन त्यांनीं प्रतिपादिलें आहे. रामाचा वनवास चौदा वर्षांचा तर अय्यर यांचा या विषयाचा व्यासंग अठरा वर्षांचा आहे. लंकादि स्थानांविषयीं लोकांतील समजूत वेगळी आहे यासाठीं त्यांची संशयानिवृत्ति होऊन नवीन स्थानें त्यांना पटावीं म्हणून अय्यर यांनीं पंपे-

पासून लंकेपर्यंतचा एक नकाशा प्रबंधाला जोडला असून तो मैलाला इंच या प्रमाणांत काढिलेला आहे व त्यावरून तो केवढा विशाळ आहे याची वाचकांना कल्पना होईल. वाटें-तील डोंगर नद्या यांचा बोध व्हावा अशी सोय नकाशांत केली असून डोंगराचे उंचीचे आंकडे नकाशावर त्याचे नांवाशीं दिले आहेत. गाडीचा रस्ता स्पष्टपणें दाखविला असून सध्यां बसविण्यांत आलेले मैलांचे दगड क्रमानें खुणांनीं दाखविले आहेत. राखींव जंगलें या प्रदेशांत सध्यांहि मोटीं आहेत तीं स्पष्टपणे त्यांत आंखलेलीं आहेत. राखींव जंगलें या प्रदेशांत सध्यांहि मोटीं आहेत तीं स्पष्टपणें त्यांत आंखलेलीं आहेत व त्यांनीं निश्चित केलेलीं स्थानें ठळक अक्षरांनीं त्यांत व्यक्त केलीं आहेत. अयोध्ये पासून रामाचे पूर्वींचे प्रवासाचा बोध व्हावा यासाठीं दोन छोटे नकाशे त्यांनीं प्रबंधाला जोडले आहेत ते वेगळे. अशा रीतीनें अय्यर यांचा या विषया वरील व्यासंग दांडगा असून हा प्रबंध लिहिण्यांत त्यांनीं परिश्रम फार घेतले आहेत यांत शंका नाहीं.

लंकादिस्थानविषयी त्यांनीं जें प्रतिपादन केलें आहे त्यांचें स्वरूप स्वभावतःच द्विविध आहे. ( १ ) पूर्वींच्या प्रचलित समजुती प्रामादिक म्हणून त्यांचें खंडण, व ( २ ) नवीन स्थानें निश्चित करितांना त्याविषयीं साधार विवेचन करून मंडण, असे त्यांच्या प्रतिपादनाचे स्वभावतः दोन भाग आहेत. त्यांनीं आपलें प्रतिपादन आपले ज्येष्ट बंधु न्या. सदाशिव अय्यर यांना प्रथम पटवून दिलें हें विशेष महत्वाचें असून

तें त्यांनीं प्रस्तावनेंत प्रारंभी सांगितलें आहे व त्यास अनुसरून त्यांनीं हा प्रबंधहि त्यांना अर्पण केला आहे. न्या. सदाशिव अय्यर हे मद्रासकडे नामांकित न्यायाधीश म्हणून प्रसिद्ध होते; त्यांनीं केलेले कित्येक निर्णय महत्त्वाचे म्हणून त्याचे लॉरिपोर्ट झाले आहेत व अशा प्रमाणें कायदेपंडितांमध्यें यांची मोठी मान्यता आहे. तेव्हां त्यांच्या मान्यतेचें महत्त्व लेखकानें स्वतांचे बंधु म्हणून आदरानें केलें असलें तरी तें स्वाभाविक उचित आहे हें विसरतां येत नाहीं. बनारसचे हिंदुविश्वविद्यालयाचे व्हाइसचॅन्सेल सर बी. एस्. शिवस्वामी अय्यर यांनीं लेखकांचें प्रतिपादन सकृद्दर्शनी गंभीर असल्याची प्रशंसा केली आहे. आणखी दोन विदुषांच्या संमतीचा उल्लेख प्रस्तावनेंत केलेला आहे तो वेगळा.

पुणें येथील " पूना ओरिएन्टालिस्ट " या त्रैमासिकाचे गेल्या एप्रिलजुलैचे जोड अंकात संपादक विद्यासुधाकर पंडित हरदत्तशर्मा यांचा अय्यर यांचे प्रबंधावर स्वतंत्र लेख आला आहे. या लेखांत अय्यर यांचे प्रबंधातील महत्त्वाचे मुद्दे संक्षेपाने देऊन त्यांचें प्रतिपादन खोडून काढणें कठीण असल्याचें त्यांनीं प्रांजलपणें लिहिलें आहे. विशेषतः जगन्नाथ मंदिर, सुग्रीवाची गुहा व महेंद्रद्वार या स्थलांविषयींची अय्यर यांची कल्पना आपल्याला पूर्णपणें मान्य झाल्याचें त्यांनीं लिहिलें आहे. त्रैमासिकाचे सहसंपादक डॉ. न. गो. सरदेसाई हे तर कांहीं स्नेह्यांसहवर्तमान हा सर्व प्रदेश स्वतः

गेल्या मार्च मध्यें पाहुन आल्याचें त्यांनीं लिहिलें आहे. रामायणांत इक्ष्वाकूंचें कुलदैवत म्हणून ज्या देवतेचा उल्लेख आहे त्या जगन्नाथाचें मंदिर अय्यर यांनीं तेथें लंकेचे स्थान निश्चित केलें आहे तेथून जवळच सध्या त्यांच नांवानें प्रसिद्ध आहे या गोष्टीचें त्यांनीं साहजिक कौतुक केलें आहे.

अशा रीतीनें मोठमोठ्या पंडितांना आपली कल्पना मान्य झाल्याचें न्या. अय्यर यांनीं प्रस्तावनेंत स्वतां नमूद केलें आहे व तें खरोखर अभिमानास्पद आहे. त्यांच्या कल्पनेला विरोध व्हावयाचा तर तो सनातनी समाजाकडुन होण्याचा संभव आहे अशी शंका सरशिवस्वामी यांनीं त्यांच्या प्रशंसा पत्रकांत व्यक्त केली असून ग्रंथकारांनी ती त्यांच्या शब्दांतच अवतरलेली आहे. अर्थात त्यांनाहि ती शंका सकारण असल्याचें वाटत आहे असे अनुमान करण्यास प्रत्यवाय नाहीं. सनातनी हा प्राणी कोणजातीचा असावा अशी लेखक व अनुमोदक यांची कल्पना आहे हें कळण्यास मार्ग नाही. न्या. अय्यर किंवा सर शिवस्वामी यांना दोष देण्याची आमची इच्छा नाही. कोणतीहि नवी कल्पना वा सुधारणा पुढे आणावयाची असली तर त्याला सनातनींकडून हटकून विरोध व्हावयाचा अशी एक सध्याच्या स्वतःला सुशिक्षित म्हणविणाऱ्या वर्गामध्यें समजूत झालेली आहे. जणुं काय सनातनी म्हणजे एककल्ली व आग्रही असावयाचा. जुन्या समजुतीविषयी तिरस्कार उत्पन्न होण्याजोगे त्यांतील दोष दाखवून ते प्रतिपक्षी यांस—निदान तटस्थाला पटविणें व नव्या समजुतीची ग्राह्यता

पूर्वींचे विरुद्ध बाजूनें सिद्ध करणें या दोन गोष्टींचा भार आपल्या आपल्यावर आहे याची जाणीवहि या आक्षेपकांना नसते. आपलें कर्तव्य पूर्णपणें ज्याला पार पाडतां येतें व जो तसें तें पार पाडतो त्याला विरोधी पक्षाचें महत्त्व वाटण्याचें कारण पडत नाहीं प्रत्युत न्या. अय्यर यांनीं सनातनींवर दुराग्रहाचे शिंतोडे उडविले आहेत पण यांचा प्रबंध एकाद्या संशोधात्मक नियतकालिकांत येण्यासारखा नाहीं असें कोणतरी प्राध्यापकांचे मत त्यांनी प्रस्तावनेंत नमूद केलें आहे. ( पृ ३६ ) असे संशोधक तरी सर्वच सनातनी असतात असें नाहीं ना? त्यांना विरोध करील तो सनातनी अशी जर सनातन्यांची व्याख्या केली तर मग भाग वेगळा पण तसें म्हटलें तर सनातनी ही एक शिवी होऊन राहणार आहे व तसा अनुभव येत असल्यानें तेंहि एक प्रकारे खरें.

न्या. अय्यर यांनीं सनातनींकडून विरोधाचा संभव दर्शविला आहे तर त्यांना अनुमोदन देणाऱ्या दोघां विदुषां पैकीं एक श्रीमती सुब्बा लक्ष्मी ( प्रस्तावना पृष्ठ ४६ ) यांनीं सर्वच विरोधकांनां दुराग्रही आणि हटवादी ठरविलें आहे. पंडित हरदत्तशर्मा यांची गणना आतां कोणत्या वर्गामध्यें करावी हें खरोखर कळत नाहीं. कारण न्या. अय्यर यांच्या शोधां पैकीं जगन्नाथ मंदिर, सुग्रीवाची गुहा व महेंद्रद्वार इतकीं स्थळें त्यांनीं पूर्णतेनें मान्य केलीं आहेत; आणि किष्किंधा, जनस्थान; लंका वगैरे इतर स्थानांविषयीं निश्चित सांगतां येत नाहीं

असें स्पष्ट लिहिलें आहे. निश्चित विधान करण्याजोगें प्रत्यक्ष प्रमाण अाच येथें उपलब्ध नाहीं असें त्यांनीं कारण दिलें आहे व तें सरळ आहे. तथापि न्या. अय्यर यांच्या प्रबंध-लेखनांतील मुख्य हेतु लंकास्थान निश्चित करण्याचा व संपाद महाशयांनीं नेमका त्या विषयीं संशय प्रदर्शित केला आहे. न्या. अय्यर यांच्या कल्पना विचारार्ह असल्याचें त्यांनीं मान्य केलें असून जबलपुरा जवळउत्खनन करून शोध करणें अवश्य आहे अशी त्यांनीं सूचना केली आहे. अर्थात् वरील तीन स्थानांवांचून इतर स्थानांविषयींच्या न्या. अय्यर यांच्या कल्पना कांहीं तरी प्रत्यक्ष प्रमाणें उपलब्ध झाल्या वांचून त्यांना मान्य नाहींत हें उघड आहे. संपादकांचीहि हा लेख लिहितांना गडबड झालेली दिसते. कारण न्या. अय्यर यांच्या प्रबंधावर हा लेख परीक्षण म्हणून लिहिला असून त्याचा मथळा “ आश्चर्यकारक व अपूर्व शोध–रावणाच्या लंकेचें निश्चित स्थान सांपडलें ” असा दिला आहे. उपसंपादक डॉ. सरदेसाई हे तर हीं सर्व स्थानें स्वतां पाहून आले आहेत तेव्हां मथळा त्यांनीं दिला व लेख संपादकांनीं लिहिला असें तर नाहींना झालें ? कांहीं असो; न्या. अय्यर यांच्या प्रतिपादनानें संशोधकांना चकित करून सोडिलें आहे यांत शंका नाहीं.

न्या. अय्यर यांनीं रामायण कालच्या ज्या स्थानांविषयीं आपल्या कल्पना पुढें ठेविल्या आहेत त्यापैकीं निदान तीन तरी पंडित हरदत्तशर्मा यांस निर्विवाद मान्य आहेत व त्यामुळें इतर स्थानांविषयीं प्रत्यक्ष प्रमाणें उपलब्ध होण्याचा

संभव त्यांना वाटूं लागला आहे हें येथें लक्षांत घेणें अवश्य आहे. रामायणकालचीं रामचरिताशीं संबंध असलेलीं स्थानें परस्परांशीं इतकीं निगडित आहेत कीं त्यांपैकीं एकाचा शोध लागला असतां इतर स्थानें क्रमानें आणि नियमित अंतरावर मिळालींच पाहिजेत. नाहीं तर कोठें तरी प्रारंभीच्या शोधांत भूल आहे असें निर्विवाद अनुमान करावें अशी वस्तुस्थिति आहे. सीतापहारानिमित्त रामाला थेट दक्षिणेकडे लंकेपर्यंत धावें लागलें; अर्थात् लंका ही दक्षिणेकडील शेवटची सीमा व अयोध्या ही उत्तरेकडील. यापैकीं न्या. अय्यर यांनीं शोधून काढलेलें व संपादकांना पटलेलें दक्षिणेकडील शेवटचें स्थान महेंद्रद्वार. महेंद्रपर्वतावरून उड्डाण करून मारुति लंकेंत गेल्याची कथा आहे. अर्थात् महेंद्रपर्वत हें रामायण-कथित स्थानांपैकीं दक्षिणेकडील शेवटचें स्थान. रामाची राजधानी जी अयोध्या तीविषयीं कोणाचाच आक्षेप नाहीं. अर्थात् पुढील स्थानें तेथून क्रमानें निश्चित करावयाचीं आहेत. पण न्या. अय्यर यांनीं शोधून काढिलेलें व संपादकांना मान्य असलेलें रामायणांतील एक स्थान महेंद्र हें लंकेजवळ असून पूर्वींची लंका म्हणून सिंहलद्वीपाविषयीं लोकांत मान्यता आहे. तेथून तें इतकें दूर व उत्तरेला आहे कीं मधील बहुतेक स्थानें प्रचलित समजुतीच्या अपेक्षेनें अगदीं दूर व वेगळीं झालीं आहेत. तेव्हां न्या. अय्यर यांच्या सर्व कल्पना पूर्णपणें मान्य करणें अथवा त्या सर्वथा सोडून देणें यापैकीं कोणता तरी एक निश्चय करणें भाग आहे.

ज्या तीन स्थानांविषयीं वि. सु. पं. हरदत्त शर्मा यांनीं आपली पूर्ण मान्यता दर्शविली आहे तीं त्यांना कोणत्या कारणास्तव पटलीं हें पाहिलें असतां वरील पैकीं कोणता मार्ग पत्करावा हें आपणांस ठरवितां येईल. कारण ज्या स्थानां-विषयीं त्यांना अद्यापि संदेह आहे त्या स्थानीं उत्खनन करावें अशी त्यांची सूचना आहे. अर्थात् त्यांना प्रत्यक्ष प्रमाणाची अपेक्षा आहे व ती वरील तीन स्थानांचे बाबतींत पूर्ण झाली असें अनुमान होतें. तेव्हां हीं प्रत्यक्ष प्रमाणें कोणतीं हें पाहूं. त्यापैकीं पहिलें स्थान जगन्नाथाचें मंदिर. रामायणांत इक्ष्वाकूंचें उपास्य दैवत म्हणून जगन्नाथाचा उल्लेख आहे व सध्यां न्या. अय्यर यांनीं ठरविलेल्या लंकेशीं एक जगन्नाथाचें मंदिर आहे. प्रत्यक्ष प्रमाण म्हणून न्या. अय्यर यांच्या प्रतिपादनां-तील हा मुद्दा पंडितजीनीं कौतुकानें पुढें केलेला पाहून खरोखर हसूं येतें. कारण रामायणांत जगन्नाथ या देवतेचा उल्लेख असला तरी तो मूर्तीचा असें म्हणण्यास आधार नाहीं. मूर्तीचा असा मानिला तरी तो कोणत्या स्थानीं आहे हें रामायणांत सांगितलें अथवा ध्वनीत केलेलें नाहीं. करंगीपासून सुमारें ९ मैलांवर एक जगन्नाथाचें मंदिर आहे व तें जगन्नाथाचें अशी लोकांत प्रसिद्धी आहे. रामायणनिर्दिष्ट जगन्नाथ हा अशी त्याविषयीं लोकांत परंपरागत समजूत नाहीं. मग रामांनीं बिभीषणास ज्या जगन्नाथाची उपासना करावयास सांगितलें तो हा कशावरून ? तर तो न्या. अय्यर यांच्या लंकेजवळ आहे म्हणून; आणि ती लंका रावणाची

कशावरून ? तर जगन्नाथाचें मंदिर जवळ आहे म्हणून. निष्पन्न काय होतें ? " इतरेतराश्रयाणि कार्याणि न प्रकल्पन्ते" दोनहि सिद्धान्त डळमळतात. ह्याच प्रकार दुसऱ्या दोन स्थानांविषयीं आहे. सुग्रीवाची गुहा न्या. अय्यर यांनीं ठरविलेली पंडितजींनीं निर्विवाद मान्य केली आहे. या गुहेच्या तोंडाशीं रामायणांत वर्णिल्याप्रमाणें सरोवर आहे. पण या साहश्यावांचून ती गुहा सुग्रीवाची असें म्हणण्यास आधार काय ? तोंडाशीं सरोवर असलेली डोंगरावरील गुहा सुग्रीवाची असें कांहीं तिचें निश्चित लक्षण नाहीं. कैमूर डोंगरावर एक मोठी खिंड आहे व तीवरून न्या. अय्यर यांनीं तो डोंगर हा रामायणांतील महेंद्रपर्वत व त्यांतील खिंड हें महेंद्रद्वार ठरविलें आहे. संपादकमहाशयांनीं वरील तीन स्थानांना आपली मान्यता देते वेळीं त्यविषयीं प्रत्यक्ष प्रमाण उपलब्ध असल्याचा जो हेतु दर्शविला आहे त्यांचें स्वरूप अशा प्रकारचें आहे. रामकथा घडून आली त्याला चार हजारांवर वर्षे होऊन गेलीं आहेत व यासाठीं स्थळनिर्णयाचे कामीं प्रत्यक्ष प्रमाणाची अपेक्षा धरणें चुकीचें आहे याची जाणीव आम्हाला येत नाहीं असें नाहीं; तथापि प्रत्यक्ष प्रमाणें उपलब्ध असल्याचें जें सांगण्यांत येतें त्यांचें खरें स्वरूप उघड करून दाखविणें भाग आहे. कारण तीं ज्यांना पटत नाहीत त्यांचेवर उगाच हटवादीपणाचा आरोप येऊं पाहतो. रामायणांतील रामाचें प्रवासवर्णन अयोध्येचे दक्षिणभागांतील आहे व हीं स्थानें त्या भागांत येतात हें निर्विवाद आहे; आणि हें प्रमाण लौकिक समजुतीनें ज्या

स्थलाविषयीं मान्यता प्रचालित आहे त्याचेहि विरुद्ध नाहीं. तेव्हां न्या. अय्यर यांनीं ठरविलेल्या व संपादक महाशयांसारख्या पंडितांना मान्य झालेल्या तीन स्थानांच्या स्वरूपांवरून त्यांच्या कल्पना पूर्णपणें मान्य करण्याचा मार्ग पत्करणें धोक्याचें आहे हें उघड आहे. त्याकरितां त्यांच्या प्रबंधाचें साकल्यानें परीक्षण करणें प्राप्त आहे. नाहीं तर सनातनी म्हणजे दुराग्रहि हे ठरलेलें आहे.

---

लेखांक २ रा

## अंतरंगदर्शन

त्या. अय्यर यांचा सर्व प्रबंध इंग्रजीत असल्यामुळें मराठी वाचकाकरितां त्यांच्या प्रतिपादनांतील मुद्दे संक्षेपानें सांगणें सोयीचें होईल यासाठीं प्रथम तें काम हातीं घेऊं. प्रबंधाची प्रस्तावना मोठी असून तींत त्यांनीं प्रबंधाचा इतिहास व आंतील प्रतिपादनाविषयीं थोडी चर्चा केली आहे. रामायणाची कथा कल्पित नसून तो एक इतिहास आहे असा त्यांचा निश्चय कसा झाला तें प्रथम सांगून त्यांनीं अयोध्येपासून शृंगवेरपुरापर्यंत स्थलें सध्यां विद्यमान आहेत व त्यावरून त्यापुढील स्थलें सध्याहि तशी विद्यमान असलीं पाहिजेत अशी त्यांची कल्पना झाली व ती निमित्त त्यांनीं जे परिश्रम केले त्यांचें प्रस्तुत प्रबंध हें फळ होय. सध्यांचे सीलोन अथवा सिंहलद्वीप हीच रावणाची लंका अशी प्रचलित समजूत आहे व त्याविषयीं भोजाचे चंपूरामायणामध्यें ( इ. स. १०१०–१०१५ ) आधार मिळतो. म्हणजे ही समजूत भोज कालीं होती हें निर्विवाद आहे. पण त्या पूर्वीचे संस्कृत वाङ्मयामध्यें याला कांहीं आधार मिळत नाहीं. इ. स. ३३० मध्यें तेथील राजा मेघवाहन–यानें सम्राट् समुद्रगुप्ताकडे रत्नांचा नजराणा पाठविल्याचें इतिहास सांगतो पण तो सिंहलद्वीपाचा अधिपति म्हणून होय. चिनी प्रवासी ह्युएन्त्संग येथें आला होता. तो सिंहलद्वीप येथील बुद्धाचे दांताचे उत्सवानिमित्त, आणि

हर्षाचे रत्नावलींत या द्वीपाचा उल्लेख आहे, तोहि सिंहलद्वीप म्हणून. लंका असें नांव या कालांतील ग्रंथांत आढळत नाहीं. किष्किंधा कांडामध्यें रावणाचें निवास स्थान म्हणून जें वर्णन आहे तें सीलोनचें असें पूर्वापर संदर्भावरून स्पष्ट दिसतें. रामायणांतील हा भाग प्रक्षिप्त आहे. तामील कवि कंबर हा बाराव्या शतकाचे उत्तरार्धांत होऊन गेला. त्यानें रामायणावर जें काव्य लिहिलें आहे त्यामध्यें हा भाग रामायणाप्रमाणें आहे. यावरून रामायणांतील हा प्रक्षेप त्याचे-पूर्वीचे कालांतील होय. दहाव्या शतकाचे उत्तरार्धांत चोल राजे प्रबळ झाले हें इतिहासज्ञाला विदित आहे. इ. स. १००० चे सुमारास त्यांपैकीं एक राजा राजराज यानें पाण्ड्य, केरळ, पल्लव, वगैरे सर्व राज्यें जिंकून घेतलीं. त्याचा पुत्र राजेंद्र यानें सीलोन घेतलें (इ. स. १००२) सिंहलचा राजा मिहिंदो व राणी यांस त्यानें पकडून कैद केलें. या निमित्त तामील व सिंहली लोकांमध्यें झगडा चालू झाला तो १५० वर्षे पर्यंत चालला होता. चोल राजे—आपणाला सूर्यवंशी म्हणवीत असत. त्यांचे विरुद्ध पक्षाचा जो सिंहल राजा त्याला—यावेळीं रावण बनविण्यांत आला असावा अर्थात् त्याचे अनुयायी जे सिंहली लोक ते राक्षस झाले. राजराज आणि राजेंद्र यांच्या शिलालेखांत या द्वीपाला "इला" असें म्हटलें आहे. इलंगई अथवा लंका यांचे इला हें जर अपभ्रष्ट रूप असेल तर या राजांचे कारकीर्दींत किष्किंधा-कांडांतील वरील प्रक्षेप घालण्यांत आले असावे अशी न्या.

अय्यर यांची कल्पना आहे. भोजाचें चंपूरामायण सुंदरकांडा-पर्यंत आहे व त्या पुढील कांडें लक्ष्मण सूरीनें लिहिलीं आहेत. भोजाचे कांडपंचकांत सिंहलद्वीपाचा उल्लेख नसल्याचें वर सांगितलेंच आहे; परंतु पुढील लक्ष्मण सूरीचे युद्धकांडांत लंकेचें वर्णन "सिंहलद्वीप कमल कर्णिकाम्" असें केलें आहे. हा कथाभाग वाल्मीकीचे युद्धकांडांत ४० व्या सर्गाचे प्रारंभीं आला आहे. येथील वर्णन वाल्मीकी वरून लक्ष्मण सूरीनें घेतल्याचें उघड दिसतें. सिंहलद्वीपाचा त्यांतील उल्लेख हाच काय तो त्यांतील अपूर्व होय. भोज हा—इ. स. १०५० मध्यें मृत्यु पावला व तोंपर्यंत तो उज्जयिनी येथें राज्य करीत होता. त्याचे चंपूत ज्या पक्षीं सिंहलद्वीपाचा उल्लेख नाहीं त्यापक्षीं त्याचे कालानंतर व राजेंद्र चोलाचे सुमारें रामायणांतील वरील प्रक्षिप्त भाग घालण्यांत आला असावा अशी आपल्या कल्पनेची उपपत्ति न्या. अय्यर यांनीं दिलेली आहे.

सध्यां रामेश्वर व मानार बेटें यांमध्यें आदामचा पूल म्हणून एक पूल प्रसिद्ध आहे. याचाच रामायणांतील नलसेतु बनविण्यांत आला. हा पूल सध्यां अर्धवट स्थितींत आहे परंतु पूर्वी हा पूर्ण होता म्हणजे ती एक संयोगभूमि होती. इ. स. १४८० मध्यें वादळामुळें ती भग्न झाली अशी नोंद रामेश्वरचे दप्तरांत नमूद आहे. आदमचा पूल हा केवळ वाळूचा आहे व रामाकरितां नलानें बांधिलेला सेतु वृक्ष-पाषाणांचा होता असें रामायण सांगतें अर्थात् सध्याचा पूल हा कांहीं नलसेतूचा अवशेष म्हणतां येत नाहीं. हा सर्व

बनाव रामेश्वराचें मंदीर बांधण्यांत आल्यानंतरचा दिसतो. इ. स. ९८५ ते १११५ पर्यंत चोलवंशांत जे तीन पराक्रमी राजे झाले ते सर्व शैव होते. त्यांपैकीं राजराज यानें तंजावरचें बृहदीश्वराचें मंदिर बांधल्याचें प्रसिद्ध आहे. यांपैकींच कोणा-तरी राजानें त्या कालीं रामेश्वर मंदिर बांधून रामांनीं लिंगाची स्थापना केल्याचा इतिहास बनविला असावा. पुढें हें पारडें फिरलें व चोल राजे मागें पडून होयसल वंश पुढें आला. होयसल वंशांतील राजा विष्णुवर्धन हा वैष्णव होता. त्या राजांचे शिलालेखांत सेतु व रामेश्वर मंदिर यांचे उल्लेख आहेत. वास्तविक राम हा शिवोपासक नसून विष्णुपासक असल्याचें रामायण सांगतें. त्याचे उलट रावण हा मात्र शिवोपासक होता. अर्थात् रामांनीं शिवलिंग स्थापिल्याची कल्पना संभवनीय नाहीं.

होयसल वंश पुढें येण्यापूर्वी चोल राजे सिंहलद्वीपावर राज्य करीत होते. त्यांचे कारकीर्दीत तामील लोक जेते व सिंहली जित असल्यामुळें तामीलांनीं सिंहलांचा फार छळ केल्याचें महावंसो या बौद्ध ग्रंथांत लिहिलें आहे. यामुळें उत्तरसीलोन मध्यें तामीळांची वस्ती फार असून दक्षिणेकडील डोंगराळ प्रदेशांत मूळची सिंहली लोकांची वस्ती आहे. या काळांत ब्राह्मणांचें वर्चस्व होऊन बौद्धांची हीन अवस्था झाली. या काळांत सिंहली ही रावणाची लंका या कल्पनेचा-उद्भव झाला व सिंहली लोक जित असल्यामुळें त्यांनीं या कल्पनेला मुकाट्यानें मान्यता दिली असावी असें न्या. अय्यर

यांचें अनुमान आहे. ही कल्पना वाढतां वाढतां तिनें क्रमानें सीलोनमध्यें प्रवेश केला. सीलोनचे पूर्व किनाऱ्यावर अमृत-गल्ली म्हणून एक खेडें आहे, त्यांत रामांनीं स्थापन केलेलें म्हणून तीर्थ असून त्यांत हनुमंतानें लंका दहन केल्यावर आपलें पुच्छ विझविल्याची आख्यायिका तेथील लोक सांगतात. हें तीर्थ हनुमानतीर्थ म्हणून प्रसिद्ध आहे. रामायणांत तर मारुतीनें आपलें पुच्छ समुद्रांत बुडवून विझल्याचें स्पष्ट लिहिलें आहे. अर्थात् असल्या आधारांवरून सीलोन ही पूर्वीची लंका असें म्हणतां येणार नाहीं.

श्रीमंत सरदार किबे व प्रसिद्ध संशोधक पार्गिटर यांचे प्रबंधाचा समाचार न्या. अय्यर यांनीं प्रस्तावने मध्यें घेतला असून त्यांचे प्रतिपादनावरील आपले आक्षेप थोडक्यांत सांगितले आहेत. न्या. अय्यर यांच्या प्रबंधाचा जो प्रथम खंड भौगोलिक विवेचनाचा आहे त्यांत एकंदर प्रकरणें १४ आहेत. प्रथम प्रकरणामध्यें लंकेसंबंधाच्या प्रचलित समजुती-वरील आक्षेप त्यांनीं दिले आहेत. सीलोन व हिंदुस्थान यांमध्यें सध्यां जो पूल आदामचा म्हणून प्रसिद्ध आहे त्याची लांबी ३० मैल असून रामायणामध्यें हिंदुस्थान व लंका यांमधील अंतर १०० योजनें सांगितलें आहे. १ ( योजन म्हणजे चार कोस हें प्रमाण प्रसिद्ध आहे. आणि कौटिलीय अर्थशास्त्रामध्यें १००० धनुष्यें म्हणजे एक कोस अशी व्याख्या दिली आहे. ती प्रमाणें पाहतां योजन म्हणजे ४००० धनुष्यें (धनुष्य = ४ हात अथवा २ वार ) होतात.

म्हणजे योजनाचे मैल ४॥ होतील. हें प्रमाण येथें जुळण्यासारखें नाहीं हें उघड आहे. २ ( ग्रीक लोकांमध्यें शर्यतीच्या प्रसंगीं किमान मर्यादा २०० वारांची धरण्याची पद्धति होती असें इतिहास सांगतो. ) समुद्राचे तीरीं आल्यावर आपल्या बरोबरीचे वानरांला तुमचे पैकीं समुद्र तरून कोण जाईल ? असा प्रश्न अंगदानें केल्याची कथा आहे. अर्थात् हा व्यवहार शर्यतीसारखा झाला. शर्यतीमधील हें प्रमाण येथें लावून पाहणें योग्य होईल. वालीशीं युद्ध करावयाचें तर तें रामाकडून होऊं शकेल असा विश्वास पटावा म्हणून सुग्रीवानें परीक्षा पाहण्यासाठीं दुंदुभीचें प्रेत २०० धनुष्यें उडविण्यास त्यास सांगितलें. वालीनें तें पूर्वी १०० धनुष्यें पायानें उडविलें होतें. अर्थात् १०० धनुष्यें ही किमान मर्यादा होय व तेंच योजनाचें प्रमाण धरणें योग्य होईल. यावरून गणित करितां १०० योजने ( १०० × २०० = २०००० ÷ १७६० ) म्हणजे ११॥ मैल होतात. योजन म्हणजे ४॥ मैल हें प्रमाण घेतलें तर ४५० मैल होतात. आदमचा पूल तर ११॥ मैल नाहीं व ४५० मैलहि नाहीं. सीलोनमध्यें, मानारचे बेटांत, किंवा रामेश्वरचे बाजूला, डोंगर नाहीं. तेथें असलेली वस्ती तर राक्षसांची नाहीं हें उघड आहे. तेव्हां सीलोन ही पूर्वीची लंका कशी होणार ?

दुसऱ्या प्रकरणांत प्राचीन संस्कृत वाङ्मयामध्यें लंके विषयीं जी माहिती मिळते तिचा विचार करण्यांत आला आहे. वराहमिहिराचे पंचसिद्धांतिकेंत ज्या लंके विषयीं वर्णन केलें

आहे ती लंका सीलोन नसून डचांचे द्वीपसमूहांतील लिंगा बेट होय. हें बेट सिंगापुरापासून सुमात्रा बेटांतील इंद्रगिरि नदी पर्यंत पसरलें आहे. लंकेंतील लोकांना ध्रुवतारा जमिनीला लागलेला ( भूलग्न ) दिसतो व मेरूशीं राहणारांला आकाशाचे मध्यभागीं ( नभसो मध्य गताम् ) दिसतो असा विशेष येथें वराहमिहिरानें दिला असून लंका ही विषुववृत्तरेखेच्या खालीं असल्याचें सांगितलें आहे. खरोखर पाहतां या दोहोंच्या माथ्यावरून बरोबर विषुववृत्तरेखा जात असून लंके मध्यें सूर्योदय होतो व सिद्धपुरीं सूर्यास्त होतो असें जें वर्णन विराहमिहिरानें केलें आहे तें या बेटाशीं बरोबर जमतें. हें बेट विषुववृत्तरेखेवर असल्याचा शोध बहुतेक आंध्र शातकर्णी राजांचे कारकिर्दींत म्हणजे तिसऱ्या शतकापर्यंचे कालांत लागला असावा असा न्या. अय्यर यांचा तर्क आहे. वराहमिहिर हा सहाव्या शतकांतला. तेव्हां त्याच्या ग्रंथांत ही माहिती असणें असंभवनीय नव्हे. अशा रीतीनें वराहमिहिराचे ग्रंथांतील लंकेचा निर्देश सीलोन विषयीं नव्हे, हें उघड होत आहे. तेव्हां त्या कालीं सीलोन बेट ही लंका मानली जात असे असें अनुमान करितां येणार नाहीं. सर्व प्राचीन वाङ्मयामध्यें रामायणा वांचून लंके विषयीं अन्यत्र निर्देश मिळत असेल तर तो एवढाच. रामायण पाहतां लंका त्रिकूटाचलीं असल्याचें कळून येतें. पंपासरोवरा वरून पुढें गेल्यावर ऋष्यमूकाचे बाजूनें रस्ता महेंद्रद्वारापर्यंत जातो व–तेथून लंकेपर्यंत जाण्यास मार्ग आहे अशी माहिती रामायणावरून आपणास कळते. तेव्हां रामाय-

णावरून पंपा व त्रिकूट हीं स्थानें निश्चित केलीं म्हणजे लंका कोठें होती याचा बोध आपणास होईल. अशा प्रकारें निश्चय करून न्या. अय्यर यांनीं पुढीलप्रकरणांमध्यें ही स्थानें ठरवि- ण्याचा प्रयत्न केला आहे.

तिसऱ्या प्रकरणांत न्या. अय्यर यांनीं त्रिकूटाचल व त्यावर असलेली लंका कोणती हें ठरविलें आहे. जबलपुरचे उत्तरेला हिराण वाहते नदी तिचेवर इंद्रण म्हणून डोंगर आहे तो त्याचे मतें त्रिकूट होय. याचे भोंवतीं सध्यां सागर नाहीं तथापि हा डोंगर हिराण नदीच्या बेटांत आहे व पावसाळ्यांत तेथें पूर येऊन सर्व जलमय होतें. प्राचीन कालीं या नदीला नेहमी विपुल पाणी राहून हा सर्व भाग जलमय असावा. सध्यां मध्य- प्रांतात गोंड लोकांची वस्ती आहे त्यापैकीं कांहीं लोक आपणांस रावणवंशीय व कांहीं बिभीषण वंशीय समजतात. विंध्य व सातपुड्यांचे डोंगरावर यांची वस्ती आहे. हे लोक मांसभक्षक असून त्यांच्या वनविहारा विषयींच्या कल्पना रामायणांतील राक्षसांचे वर्णनांशीं जमतात. सातपुड्याचे जंगलात व छोटा नागपुर भागांत कोरकस म्हणून रानटी लोक आहेत त्यांचें वानरांशीं साम्य दिसतें. त्रिकूटाशीं सुवेलाचल असल्याचें रामा- यणांत वर्णन आहे त्याप्रमाणें इंद्रणचे ईशान्येला एक डोंगर आहे तो पूर्वीचा सुवेल होय.

चौथ्या प्रकरणांत लंकेविषयीं आणखीं प्रमाणें न्या. अय्यर यांनीं दिलीं आहेत. सुग्रीवानें सीताशुद्ध्यर्थ दक्षिणेकडे जाणाऱ्या

वानरांला सर्व विंध्य व नर्मदा शोधावयास सांगितलें असून त्याप्रमाणें तें शोधल्याचें जें वर्णन रामायणांत आहे त्यांत व मारुतीच्या लंकेपर्यंतच्या प्रवासांत नर्मदेचें नांव नाहीं त्याअर्थी विंध्य व नर्मदा यामध्यें लंका असावी असें दिसतें. तसेंच या शोधांत अंगदानें वाटेंत एक राक्षस भेटला असतां त्यास रावण समजून मारल्याचें जें वर्णन आहे त्यावरूनहि रावणाची लंका विंध्याचे असपास असल्याची वानरांची कल्पना स्पष्ट होते. विंध्याचे नैर्ऋत्य टोंकाशीं आल्यांवर हे वानर तेथे बसल्याचें वर्णन आहे. अशा तऱ्हेचें डोंगराचें टोंक या सर्व प्रदेशांत कैमूर डोंगाराचें आहे. कहंगीचे पूर्वेला हा डोंगर आहे. येथें ते चूकून एका ऋक्ष बिळांत शिरलें व तेथून त्यांना एक श्रमणीनें बाहेर आणून सोडिलें. सध्यां येथें आस्वलांचा उपद्रव आहे. तेव्हां ही गुहा येथें जवळपास असावी. येथें त्यांची व संपातीची गांठ पडली. या भेटींत त्यांना रावण तेथून शंभर योजनें समुद्र ओलांडल्यावर एका बेटांत राहात असल्याचें कळलें. संपातीचा पुत्र सुपार्श्व महेंद्राचे खिंडीत माशांसाठीं टेहळणी करीत असतां एक काळाकुट्ट पुरूष एका सुंदर स्त्रीला घेऊन जात असलेला त्यानें पाहिला व हें वृत्त त्यानें पित्याला सांगीतलें आणि मग तेथील सिद्धांकडून रावणानें सीतेचा अपहार केल्याचें वर्तमनहि कळलें तेव्हां सुपार्श्वानें पाहिलेला पुरुष रावण होय असा त्यांचा निश्चय झाला. या वरून संपत्ती विंध्याचे दक्षिण उतरणीवर एकाद्या गुहेंत रहात असावा. या डोंगराचे उरत-

भागीं मोठीं खिंड आहे. हिला सध्या कटस खिंड म्हणतात. जबलपुर गॅझेट मध्यें तिचें वर्णन wonderful cut असें केलें आहे. तींतून कैर नदी वाहते. संपातीचे गुहेपासून डोंगराचा भाग सखल आहे व त्या पुढें ही खिंड म्हणजे रामायण कालचें महेंद्रद्वार होय. मारुती महेंद्रगिरीपासून शंभर योजनें समुद्र ओलांडून लंकेत गेल्याचें वर्णन आले आहे. त्या वरून डोंगराचे दक्षिणेला असलेला डोगर त्रिकूटाचल होय.

पांचव्या प्रकरणांत महेंद्रद्वार, सागर व लंका या विषयीं विवेचन आहे. महेंद्रपर्वताला तीन शिखरें असल्याचें रामायणांत सांगितलें आहे त्या प्रमाणें कैमूर डोंगराला तीन शिखरें आहेत. सीताशुद्धीनंतर वानर परत आल्यावर त्या आनंदांत त्यांनीं सुग्रीवाचे मधुवनांत शिरून यथेच्छ मधुपान केलें असें वर्णन आहे त्या प्रमाणें सिंग्रामपूरचे जवळ सध्यांहि मोहाचीं झाडें विपुल आहेत. तेथें राहणारे कोरकस लोक अजूनहि मधुपान करितात. महेंद्रद्वारापासून त्रिकूटापर्यंत समुद्र शंभर योजनें होता असें रामायण सांगतें. शंभर योजनें म्हणजे ११।। मैल होतात असें आपण ठरविलें आहे. कटसखिंडीपासून मजहोलीपर्यंत पांच मैल मोठा रस्ता आहे. तेथून एक फांटा इंद्रणडोंगराचे उत्तरटोंकापर्यंत जात आहे व तो ७ मैल आहे. मिळून १२ मैल होतात. मिळून हें अंतर शंभर योजनाचे ठरविलेल्या प्रमाणाशीं जमतें. कैमूरचे पूर्वेला सिदोरा हवेली आहे व तिचा पश्चिमेकडील अर्धभाग ५० चौरस मैलांचा असून त्यांत परपेत, कैर व हिराण नद्या

वाहतात. अशा रीतीनें हा प्रदेश जलमय असल्यानें त्याला सागर असें नांव प्राप्त झालें असावें. मोठ्या जलाशयांना सागर, समुद्र, अंबुधि अशी नांवें देण्याचा आमचे लोकांचा परिपाठ प्रसिद्ध आहे.

सहाव्या प्रकरणांत न्या. अय्यर यांनीं पंपा व ऋष्यमूक या विषयीं विचार केला आहे. हीं दोनहि जनस्थान ते लंका यामध्यें येतात. ऋष्यमूक ही टेंकडी पंपासरोवराचे पूर्वेला आहे. ऋष्यमूकाची चढण फार त्रासदायक म्हणून " सुदुःखा रोहणः " असें तिथें वर्णन आहे. ऋष्यमूकाचे रस्त्याचे बाजूला वानर बसले असतां रावणाचा गर्दभरथ त्या रस्त्यानें गेला व त्यावेळीं सीतेनें आपले अलंकार त्यांकडे फेंकले. पंपेवर त्यावेळीं बांधवाट असावी. पंपेचें वर्णन " सुदूर संक्रम " असें केलें आहे. संक्रम म्हणजे सांकव बाणाचे कादंबरींत पंपेचें " पद्मसरम् " म्हणून वर्णन केलें असून त्यांत " मध्ये चारिणा " असा शब्द आहे व त्यावरून तेथें सांकव होता असे अनुमान होतें. रामायणांतील वर्णनावरून हंपीजवळची तुंगभद्रा मात्र पंपा नव्हे हें निश्चित होय.'

सातव्या प्रकरणांत ऋष्यमूक ते महेंद्रद्वारा पर्यंतचे मार्गा-विषयीं विवेचन आहे. पंपा, ऋष्यमूक, किष्किंधा व प्रस्रवण यांचीं स्थानें निश्चित ठरविण्यासारखें साधन रामायणांत नाहीं. दक्षिणेकडे जातांना वाटेंत आधीं पंपा लागते व तेथून महेंद्रद्वाराकडे जावयाचें म्हणजे पंपा ओलांडून पूर्वेकडे ऋष्य-मूका जवळून जावें लागतें. किष्किंधा व प्रस्रवण हीं वाटेंतच

असून त्यांमध्यें अंतर फार नाहीं. या प्रमाणें विवेचन करून न्या. अय्यर करंगीकडे वळले आहेत. हें गांव भारनार टेंकडीचे पायथ्याशीं व हिरण नदीचे उत्तरेला १॥ मैलांवर आहे. टेंकडीचे उतरणीवर जगन्नाथाचें मंदिर आहे. जगन्नाथाची उपासना करण्याचा उपदेश रामांनीं बिभीषणाला केल्याचें उत्तरकांडांत सांगितलें आहे तो हाच देव असावा असा न्या. अय्यर यांचा तर्क आहे. लंका तेथून जवळच असून रावणावर जय मिळाल्या निमित्त रामांनीं तें मंदिर बांधिलें असावें अशी न्या. अय्यर यांची कल्पना आहे. करंगीपासून उत्तरेकडे ६ मैल रस्ता सरळ गेला आहे. महेंद्रद्वारापासून नैर्ऋत्येकडे येणारा रस्ता कैमूर घाटांचे माथ्यावर आल्यावर रावणाचा रथ या रस्त्यानें महेंद्रद्वाराकडे गेला अशी त्याची माहिती नसल्यामुळें वानर तेथून दक्षिणेकडे भारनार टेंकडी शोधीत खालपर्यंत गेले. कैमूर व भारनार हे दोनहि डोंगर विंध्याचेच भाग होत व करंगीपासून उत्तरेकडे जाणारा म्हणून वर सांगितलेला रस्ता यामधून जातो. भारनारचे या भागांत टेंकड्या वर टेंकड्या रचून ठेविल्याप्रमाणें पसरल्या आहेत. व यामुळें हा प्रदेश स्वभावतः अत्यंत दुर्गम्य आहे. कैमूरघाट माथ्यावर आल्यावर तेथून पूर्वेकडे मार्ग असून तो महेंद्रद्वारापर्यंत जातो व तेथून पुढें डोंगरांतून जाण्याला मार्ग आहे याची कल्पना संपातीची भेट होईपर्यंत वानरांला नव्हती. रावणाचे लढाऊ राजकारणाचें हें गुपित त्या वेळीं बाहेर पडलें.

आठव्या प्रकरणांत ऋष्यमूक म्हणजे सिंगोरगड कसा याची चर्चा आहे. करंगीपासून उत्तरे कडे जाणारा रस्ता सहा मैलां नंतर पश्चिमेकडे वळतो. तेथून थेट उत्तरेला अथवा पूर्वेला जाण्याचा मार्ग नाहीं. पूर्वेला महेंद्रद्वाराकडे रस्ता सध्यां आहे तरी प्राचीनकाळीं तो कोणाला विदित नव्हता—तेथून पश्चिमेकडे जाणाऱ्या रस्त्याला २ मैलावर सिंग्रामपुर व तेथून ४ मैलांवर सिंगोरगड आहे. सिंगोरगड येथें सध्यां एक डोंगरीकिल्ला आहे. कबंधानें केलेल्या ऋष्यमूकाचे वर्णनाशीं येथील वस्तुस्थिति मिळती आहे. याचे पश्चिमेला पूर्वी मोठें ३५ चौरस मैलांचें तळें होतें अशी दमोह गॅझेटमध्यें नोंद आहे. हीच पूर्वीची पंपा असावी. ऋष्यमूकार गुहा असून तींत सुग्रीव राहतो व ती समोर गोड पाण्याचें तळें आहे असें वर्णन कबंधानें केलें आहे त्याप्रमाणें सध्यां-या किल्यावर तळें आहे.

नवव्या प्रकरणांत किष्किंधेचें स्थान न्या. अय्यर यांनीं निश्चित केलें आहे रामायणांत किष्किंधेचें वर्णन गिरिगुहा म्हणून केलें आहे. सिंगोरगड किंवा ऋष्यमुकचे उत्तरेला जो मोठा पूर्व पश्चिम रस्ता महेंद्रद्वाराकडे जातो त्याचे उत्तरेला जंगलामध्यें सुमारें १॥ चौरस मैलाचें एक विवर आहे. तीन बाजूंनीं टेंकड्या असून त्यांवर दाट जंगल आहे, ही किष्किंधा होय. या विवराकडे जाण्याला अरुंद पायवाट मोठ्या रस्त्याचे उत्तरेला आहे किष्किंधाद्वार म्हणून रामायणांत ज्याचा उल्लेख आहे तें द्वार म्हणजे ही पायवाट. सध्यां येथें दोन लहान खेडीं आहेत.

दहाव्या प्रकरणांत उत्तरकांडांतील लंका विषयक कथानकां-वरून लंका हें द्वीप नसून समुद्रामध्यें असलेली पुरी असें त्या. अय्यर यांनीं निश्चित केलें आहे.

अकराव्या प्रकरणांत लंका विषयक विवेचन पुढें चालू आहे. सीताशुद्धयर्थ सुग्रीवानें दक्षिणेकडे वानरांना पाठवितांना तिकडील देशाविषयीं जी माहिती सांगितली त्यांत विंध्य व नर्मदा यांमधील प्रदेश आले असून पुढील वर्णनांत रावण निवासस्थान म्हणून सीलोनचें वर्णन आलें आहे. तेथें त्याचें कोणतेंहि नांव दिलेलें नसलें तरी सीलोन विवक्षित आहे यांत शंका नाहीं. अशोकाचे वेळीं बिहारचे बौद्धानुयायी तिकडे गेले व त्यांनीं या द्वीपास सिंहलद्वीप नांव दिलें. खिस्ताब्दाचे प्रारंभींच्या गुणाढ्याचे-बृहत्कथेंत हें नांव आढळतें. त्यापूर्वीं अशोकाचे लेखांत किंवा कौटिल्याचे ग्रंथांत या द्वीपाला ताम्रपर्णी म्हटलें आहे, सुग्रीवानें केलेल्या या वर्ण-नांत ताम्रपर्णीचें मुखाशीं पांड्यकवाट सांगितलें असून पुढें समु-द्रांत महेंद्रगिरी असल्याचें सांगितलें आहे. ताम्रपर्णीचे मुखाशीं असलेलें कोलकाई हेंच पूर्वीचे पांड्यराजांचे पांड्यकवाट होय परंतु त्यांचे पुढें सांगितलेला महेंद्रपर्वत सध्या दिसत नाहीं. उलट ताम्रपर्णीचे मुखाचे नैऋत्येला ५० मैलावर मलयाचे माथ्यावर महेंद्रगिरि म्हणून एक टेंकडी आहे. अशा रीतीनें महेंद्र ताम्रपर्णीचे मुखाशीं असल्यावर रामेश्वरी रामसेनेची तळाची जागा व धनुष्कोटी येथें दर्भशयन मानितात त्याला आधार काय ? वास्तविक रावणाची लंका कोठें आहे सुग्री-

वाला माहीत नाहीं. येथील सर्व भूगोल वर्णन प्रक्षिप्त आहे. तथापि रावणाचा गर्दभरथ त्यानें पंपेवरून ऋष्यमूका जवळून जातानां पाहिला होता व रावणाचा जाण्याचा मार्ग मात्र त्याला माहीत होता व त्यास अनुसरून त्यानें दक्षिणेकडे सीताशुद्धर्थ जाणाऱ्या वानरांना सारा विंध्य व नर्मदेवरील गुहा शोधावयास सांगितलें हें उघड आहे. त्रिकूटाचल व लंका यांचें स्थान कोठें असावें व शोधण्याची शेवटची सीमा कोणती हें न्या. अय्यर यांना यावरून अनुमानितां आलें व त्या प्रमाणें त्यानीं यत्न करून तीं स्थानें त्यांनीं निश्चित केली. सुग्रीवाचे तोंडीं घातलेला भूगोलवर्णनाचा प्रक्षेप खिस्ताब्दारंभा नंतर कांहीं शतकां नंतरचा आहे. कारण ४।४० यांत सप्त-राज्योपशोभित यवद्वीपांचा उल्लेख आहे व तीं राज्यें खिस्ता-ब्दाचे कांहीं शतकानंतरचीं आहेत.

बाराव्या प्रकरणांत विश्वामित्रांचा सिद्धाश्रम व ताटिका वध. तेराव्यांत कुलपति व गोत्रनामें यांविषयीं विवेचन असून चौदाव्यांत अयोध्येपासून शरभंगाश्रमा पर्यंतच्या रामाच्या प्रवासांविषयींची रामायणांतून माहिती दिली आहे. लंके-विषयीं त्यांत विवेचन नसल्यामुळें त्यांचा संक्षेप येथें तदे नाहीं. रावणानें सीतेचा अपहार जनस्थानांतून केला अशी कथा आहे हें स्थान दमोह जिल्ह्यांत असून तेथील भूमि अत्यंत सुपीक असून हा प्रदेश सुमारें ८०० चौरस मैलांचा आहे. रामायणांतील कथा म्हणजे दुसरें कांहीं नसून या भूमीसाठीं आर्य व गोंड यांमध्यें जो कलह झाला त्याचा

इतिहास होय असा आपला अभिप्राय न्या. अय्यर यांनीं प्रस्तावनेंत प्रारंभींच दिली आहे (पृ. १०). संकीर्ण विषयां-विषयींचे विवेचनाचा यापुढें दुसरा खंड असून त्याचीं सहा प्रकरणें आहेत. त्यांचाहि प्रस्तुत मुद्यांशीं कांहीं संबंध नाहीं यासाठीं त्यांचा नाममात्र उल्लेख करून पुढें चलूं.

---

लेखांक ३ रा

## सिंहलद्वीपावरील आक्षेप

न्या० अय्यर यांच्या प्रबंधाविषयीं विचार करावयाचा म्हणजे प्रथम त्यांच्या प्रतिपादनाची विभागणी करणें अवश्य आहे. रामायणांतील स्थलनिश्चयाचे कामीं रामायण हें मुख्य प्रमाण आहे; तथापि त्यांत कोणत्याहि स्थळाचे अक्षांशरेखांश दिलेले नाहींत यामुळें लोकांतील प्रचलित समजूत व रामायणांतील वर्णन यांच्या मेळ जमतो काय तें पाहणें हेंच त्याचें साधन होय; याविषयीं कोणाला संशय नाहीं. रामायण ही कल्पित कथा नसून इतिहास आहे असें पटल्यावर न्या. अय्यर यांनीं प्रथम अयोध्या ते शृंगवेर-पुरापर्यंत स्थलनिश्चय केल्याचें लिहिलें आहे तें याच पद्धतीनें होय. नाहींतर अयोध्येचें वर्णन रामयणांत मिळालें तरी त्यावरून ती कोठें होती हें कसें ठरावयाचें ? अर्थात् जें स्थान सध्यां लोकांमध्यें अयोध्या म्हणून मानिलें जातें त्याचा शोध प्रथम करावा लागतो. रामकालचे वाडे जरी सध्यां विद्यमान नसले तरी पर्वत–नद्या वगैरे कांहीं बदलत नाहींत. व रामायणांतील वर्णनाशीं सादृश्य पहावयाचें तर त्यांचें होय. हें सादृश्य न जमलें तर लोकांतील समजूत चुकीची असें म्हणणें भाग आहे. अशा रीतीनें प्राचीन समजूत चुकीची ठरल्यावर रामायणांतील वर्णनाचे धोरणानें तें स्थान शोधावयाचें आहे. न्या. अय्यर यांनीं या पद्धतीचा

अवलंब केला आहे व तो युक्त आहे. तेव्हां प्रथम त्यांनीं सध्यांचें सिंहलद्वीप ही रावणाची लंका अशी जी लोकांत समजूत आहे तीवर काय आक्षेप घेतले आहेत तें पाहूं. त्यांचे आक्षेप युक्त असतील तर दुसरा मार्ग पत्करणें भाग आहे; मग तो त्यांचे मागून जाण्याचा असो वा नवीन शोधावयाचा असो.

## शतयोजनांचें प्रमाण.

सध्यांचें सिंहलद्वीप ही रावणाची लंका अशी लोकांत समजूत आहे. या समजुतीवर न्या. अय्यर यांचे जे आक्षेप आहेत त्यांमध्यें हिंदुस्थानचें दक्षिणटोंक व लंका यामध्यें शतयोजन समुद्र असल्याचें रामायणांत वर्णन आहे त्याप्रमाणें मधील अंतर जमत नाहीं असा एक आक्षेप आहे व तो खरा आहे. पण यासाठीं शंभर योजनें म्हणजे ११॥ मैल ठरविण्याचा जो प्रयत्न त्यांनीं केला आहे तो विचित्र आहे. वालीनें दुंदुभीचें प्रेत १०० धनुष्यें इतकें लांब पायानें उडविलें व रामांनीं तें प्रेत सुकल्यावर २०० धनुष्यें दूर उडविलें अशी कथा रामायणांत आहे व यावरून शर्यतीची किमान मर्यादा १०० धनुष्यें त्यांनीं धरिली आहे. ग्रीक लोकांत अशी पद्धति असल्याचें प्रमाण त्यांनीं आपल्या कल्पनेला पोषक म्हणून येथें दिलें आहे. वास्तविक येथें चढाओढीचें काम नाहीं. वालीचे सामर्थ्याची कल्पना रामाला पटविण्यासाठीं सुग्रीवानें वरील कथा त्याला सांगितली आहे. न्या. अय्यर यांनीं शर्यतीची किमान

मर्यादा म्हणून हें प्रमाण घेतलें आहे; पण त्यांनीं घेतलेलें प्रमाण वालीचे लोकविलक्षण सामर्थ्याची प्रतीति रामाला आणून देण्यासाठीं सुग्रीवानें योजलें होतें हें ते विसरले. अर्थात् ही किमान मर्यादा नव्हे. ग्रीकलोकांमधील मर्यादा पळण्याचे शर्यतींतील असेल; तें येथें काय कामाचें ? दुसरें असें कीं सीताशुध्यर्थ गेलेले वानर समुद्रतीरीं येऊन तेथून पलीकडे कसें जावयाचें या चिंतेंत असतां सुग्रीवानें आपल्या सहकाऱ्यांला कोण किती लांब पोहून जाईल ? असा प्रश्न विचारिला त्यावेळीं प्रथम गज नांवाचे वानरानें आपण दश-योजनें पोहून जाऊं असें उत्तर दिलें (४।६५।३). अर्थात् दश योजनें म्हणजे न्या. अय्यर यांचे मताप्रमाणें १००० धनुष्यें होतात. अर्थात् १०० धनुष्यांची जी किमान मर्यादा न्या. अय्यर यांनीं ठरविली तिचें–उल्लंघन रामायणांत व तेंहि शर्यती सारख्या चढाओढीच्या प्रसंगीं आहे. विचार केला तर येथील दोन प्रकारचे शर्यतीमध्यें पहिलींत ही मर्यादा अधिक व दुसरींत कमी दिसते. जड पदार्थ पायानें उडविण्याचा तर तो १०० धनुष्यें अर्थात् २०० वार फेंकणें ही किमान मर्यादा म्हणतां येणार नाहीं, आणि पोहण्याचे कामीं दशयोजनें किंवा २००० वार ही मर्यादा शोभत नाहीं. कारण दशयोजनें म्हणजे सरासरी १। मैल होईल; आणि इतकें पोहण्याचें काम सध्यांहि सामान्यपणें पोहतां येणाराला करण्यास विशेष श्रम वाटणार नाहींत.

कुंभकर्णाचें वर्णन करितांना त्याचे शरीराचा विस्तार

रामायणांत शंभर धनुष्यें ( धनुःशतपरीणाहः ६ । ६५ । ४० ) सांगितला आहे. न्या. अय्यर यांचे वरील कल्पनेप्रमाणें तो अर्थात्–२०० वारांचा होईल. त्यांनीं सध्यां जी लंका ठरविली आहे ती इंद्रणडोंगरावर व त्याचा विस्तार फार तर चार चौरस मैल होईल. या डोंगराचे शिखरावर त्यांची लंका आहे व तें शिखर मैल लांब असून अरुंद असल्याचें त्यांनीं लिहिलें आहे ( पृ. १९ ). कुंभकर्णाची निद्रा तर प्रसिद्ध आहे. तेव्हां त्याला निजावयाला तरी हा प्रदेश पुरेसा होईल काय ? आणि त्याच्या शय्येकडे हा प्रदेश सोंपवून दिल्यावर बाकी वस्ती कोठें रहावयाची ?

कुंभकर्णाविषयीचें वर्णन अक्षरशः घ्यावयाचें नसून त्याचा देह विशाल होता इतकेंच येथें विवक्षित आहे व याची जाणीव आम्हाला आहे आणि न्या. अय्यर आमचे म्हणण्यावर हा आक्षेप घेतील याची आम्हांला कल्पना आहे; तथापि यावेळीं त्यांनां सुचणारा व्यवहारिकसमंजसपणा समुद्राचा शतयोजनाचा विस्तार मोजतेवेळीं त्यांनीं दाखवावा इतकेंच त्यावर त्यांना आम्हीं सांगतों. समुद्राचा विस्तार त्या वानरांनीं, रामलक्ष्मणांनीं अथवा वाल्मीकांनीं शंकुसाखळी हातांत घेऊन मोजून पाहिला होता असें नव्हे. शत सहस्रादि शब्द पुष्कळ या अर्थी संस्कृत वाङ्मयामध्यें योजण्याची पद्धति आहे व तीस अनुसरून फार दूर इतकाच अर्थ येथें घ्यावयाचा आहे. या विषयीं रामायणांतीलच एक उदाहरण देतों. विश्वामित्रमखरक्षणा-करितां राम गेले असतां मारीच नेहमींप्रमाणें वेदीवर बांवून

गेला, त्यावेळीं रामांनीं बाण मारिला त्या बरोबर तो उडून तेथून शंभर योजनांवर समुद्रांत जाऊन पडला ( क्षिप्तः समुद्रे शत योजने ३। ३८।१८ ). रामाविषयींचा आपला अनुभव रावणाला निवेदन करितांना मारीचानें स्वतां हें वर्णन केलें आहे व त्यांत शतयोजनांचें हें प्रमाण आलें आहे. बाल कांडांतील कथेंत ही गोष्ट विश्वामित्राचे सिद्धाश्रमांत झाल्याचें व अरण्य कांडांतील कथेंत दण्डकारण्यांत झाल्याचें सांगितलें आहे. त्यावरून फार तर दंडकारण्यांत सिद्धाश्रम होता असें म्हणावें म्हणजे विरोध येणार नाहीं. कांहीं असलें तरी गंगेच्या दक्षिणतीरीं बक्सारचे पश्चिमेला सिद्धाश्रमाचें स्थान आम्हीं निश्चित केलें आहे ( रा. स. उ. १४५ ). तें बदलण्याचें कारण नाहीं. तेथून ११॥ मैलांवर कोणताच समुद्र येणें शक्य नाहीं. न्या. अय्यर यांनीं ठरविलेल्या लंकेजवळचा कल्पित समुद्रहि तितक्या अंतरावर नाहीं तेव्हां रामाचे बाणानें तो दूर अंतरावर जाऊन पडला व त्यानें समुद्रमार्गें जाऊन कशीबशी लंका गांठली इतकाच त्याचे भाषणाचा अर्थ समजावयाचा आहे.

## रावणाचा रथ

न्या. अय्यर यांनीं रावणानें सीतेला आपल्या गर्दभ-रथांतून लंकेपर्यंत नेलें अशी कल्पना करून तीवर लंके-पर्यंतचा मार्ग आंखिला आहे रावण पंचवटींतून सीतेला घेऊन बाहेर पडला त्यावेळीं गर्दभरथांतून बाहेर पडला हें

खरें आहे. पण जटायूनें वाटेंत त्याचा सारथि मारून व रथ मोडून टाकिल्यावर पुढील प्रवास त्यानें दुसऱ्या गर्दभ-रथांतून केला अशी जी त्यांनीं कल्पना केली आहे (पृ० ३९) तिला आधार काय ? तर ते म्हणतात वाल्मीकि रामायणास अनुसरून त्यानें सर्व कथानक लिहिलें आहे म्हणून. चंपूमध्यें तसें विधान आहे हें खरें आहे पण येथें त्याचा आधार काय कामाचा ! वास्तविक रावणानें सीतेचा अपहार केल्याची कथा मुख्य आहे; त्याचे वाहनाला येथें तादृश महत्त्व नाहीं. पण न्या. अय्यर यांनीं लंकेविषयीं जो नवीन स्थल निश्चय केला आहे त्या दृष्टीनें त्याला महत्त्व आलें आहे. कारण त्यानीं जनस्थानापासून लंकेपर्यंत गाडी-रस्ता सध्यां आहे व पूर्वी असावा असें अनुमान केलें आहे. सध्यांचें सिंहलद्वीप ही लंका असेल तर तेथपर्यंत गाडीरस्ता होता असें अनुमानहि करणें युक्त होणार नाहीं. कारण रस्ता असल्यावर तो सर्वथा नष्ट होणें शक्य नाहीं. त्याचा कांहीं तरी अवशेष राहणारच. तेव्हां रथांतून रावण गेल्याची कल्पना करून त्यांनीं दोन हेतु साधले आहेत. रस्त्याचें अस्तित्व मान्य केल्यावर हा प्रवास फार दूरचा शेंकडों मैलांचा–मानितां येणार नाहीं व मध्यंतरीं दुर्लंघ्य पर्वत किंवा जलाशय असल्याची कल्पना करितां येणार नाहीं. अर्थात् मधील प्रवासाचा मार्ग त्यांनीं या धोरणानें—आंखला आहे. बाकी सध्यां हा रस्ता विद्यमान आहे यावरून त्यापूर्वी असावा अशी कल्पना करणें साहसाचें आहे. कारण, मग जे

मार्ग, ते कधीं आंखण्यांत आले, या विषयीं दाखले आहेत त्यावांचून सर्व मार्ग अनादि म्हणण्याची पाळी येईल. बरें; अशा रीतीनें ज्या लंकेपर्यंत गाडीरस्ता आहे ती कोठें आहे हें त्यावेळीं कोणाला माहित नसावें याचें कारण काय? रावणानें सीतेचा अपहार केल्याचें वृत्त प्रथम जटायूकडून रामाला कळलें तेव्हांपासून लंका कोठें आहे? व तिकडे जाण्याचा मार्ग कोणता? हें वाटेंत भेटेल त्याला ते विचारीत असतां सर्वांनीं कानावर हात ठेविलें हें आश्चर्य नव्हे काय! रावण सीता घेऊन जात असतां त्याला सुग्रीवादी पांच वानरांनीं व पुढें संपातीचा पुत्र सुपार्श्व यांनीं पाहिला अर्थात् तो अदृश्य होऊन जात नसे हें निर्विवाद आहे. कैमूरघांटाचे माथ्यावरून सिंग्रामपुरकडे जो रस्ता जातो त्याला पूर्वेकडे एक फांटा फुटतो व तो कटस खिडीपर्यंत जातो. हा रस्ता ज्यावेळीं रावण व त्याचे राक्षस यांनीं आपल्या लष्करी हाल चाली (military secret) चे दृष्टीनें गुप्त ठेविला होता व रावणाचें निवासस्थानहि गुप्त ( secret abode ) होतें अशी न्या. अय्यर यांची कल्पना आहे ( पृ ६५ व ६६ ) पण तिला ते म्हणतातात या वांचून कोणताहि आधार त्यांनीं दिलेला नाहीं. वानर ऋक्षबिळांत शिरून व बाहेर पडण्याला मार्ग न सांपडून गोंधळले असतां स्वयंप्रभा नामक तापसीनें त्यांना डोळे मिटावयास सांगून बाहेर आणून सोडल्याची कथा आहे व तीवर न्या. अय्यर यांनीं या मार्गाचे गुप्तपणाची कल्पना आधारलेली आहे असें दिसतें. पण गाडीरस्ता अस-

लेला रस्ता गुप्त कसा राखतां येईल ? आणि स्वयंप्रभेला तो मार्ग माहीत होता व ती तर राक्षसी नव्हती मग राक्षसां-वांचून तो कोणाला माहीत नव्हता असें कसें म्हणतां येईल ? वास्तविक गाडीरस्त्याची कल्पना मूळांत चुकलेली आहे. भोजानें दुसऱ्या रथाची कल्पना स्वतां रचलेली आहे व यामुळें त्याचीहि तेथें फसगत झाली आहे. रावण सीतेला घेऊन जात असतां मार्गांत एका गिरीशिखरावर पांच वानर बसलेले पाहून सीतेनें आपले अलंकार एका वस्त्रांत बांधून त्याचे आंगावर फेकल्याची कथा रामायणांत आहे व तिचा अनुवाद चंपूंत केलेला आहे. वानर उंच डोंगरावर बसलेले व सीता रावणाचे रथांतून जात होती अर्थात् हा मार्ग त्या डोंगराचे वर नसून खालचा तेव्हां त्यांचें आंगावर अलंकार फेकावयाचे तर ते वर फेंकावे लागतील. चंपूमध्यें येथें ते खालीं टाकल्याचें सांगितलें आहे ( अपातयत् ) येथें खालीं या अर्थी अव " हा उपसर्ग नसला तरी " पत धातूचा प्रयोजक प्रयोग असतां खालीं-पडल्याचा अर्थ त्यांतून स्वीकारतः व्यक्त होतो. सूर्यबिंबाचे पतनाचा जो दृष्टांत येथें ( अभिपतत्पतंग बिंब शंकावहं ) कवीनें योजिला आहे त्यावरून अलंकार खालीं टाकल्याची क्रिया निर्विवाद सिद्ध होते. अलंकार खालीं टाकावयाचे व ते डोंग-राचे शिखरावर पडावयाचे म्हणजे सीतेचे गमन त्याचे वरून मानणें भाग आहे व तसें गमन विमानांतून संभवतें. त्या करितां मूळ रामायणच पाहूं. जटायूला मारल्यावर रावणानें तिला कशी नेली त्याचें—

स्वतुतां रामरामेति रुदन्तीं लक्ष्मणेतिच ।
जगामादाय चाकाशं रावणो राक्षसेश्वरः ॥३।५२।१८

असें वर्णन आहे. येथें त्याचें वहान कोणतें हें स्पष्ट सांगितलेलें नाहीं पण तो ज्या पक्षीं तिला घेऊन आकाशांत गेल्याचें सांगितलें आहे त्यापक्षीं तो पुढें विमानांतून गेला असावा असें दिसतें. या पुढील रावणाचे प्रवासाचे वर्णनांत आकाश शब्द दहा बारा वेळ तरी आला आहे. तिचे अंगावरील फुलें खालीं भूमीवर पडलीं व वाऱ्याचे वेगानें त्याचे मागून उडूं लागल्याचें (५२।३३) वर्णन तो आकाशां- तून गेल्याचें (५२।३२) सूचित करितें. तसेंच कित्येक पशु त्यांचे छाये मागून जाऊं लागल्याचें वर्णन आहे (५२।४१) त्यावरूनहि रावण विमानानें गेल्याचें दिसतें. सुग्रीवादि पांच वानरांचे अंगावर सीतेनें आपले अलंकार टाकल्याची जी कथा भोजानें चंपूत अनुवादल्याचें वर सांगितलें आहे ती विषयीं रामायणांत--

उत्तरीयं वरारोहा शुभान्याभरणानि च ।
मुमोच यदि रामाय शंसेयुरिति मैथिली ॥ ३ । ५४ । २
वस्त्रमुत्सृज्य तन्मध्ये निक्षिप्तं सहभूषणम् ॥

असें वर्णन आहे. अर्थात् सीतेनें वस्त्रांत अलंकार बांधले व ती मोटली अचळ सोडली व ती गिरिशिखरावर वानर बसले होते त्यांचे मध्यें पडली असें दिसतें. गाडींतून जातां जातां पदार्थ देण्याचा असेल तर घेणारा वर किंवा खालीं कोठेंहि

असो तो बाजूला फेंकावा लागतो. येथें तर तिनें मोटली सोडल्याचें व ती गिरिशिखरावर पडल्याचें सांगितलें आहे. तेव्हां येथें त्याचें वाहन कोणतें तें सांगितलें नाहीं व पूर्वी त्याचा रथ होता यावरून पुढें सुद्धां रथ असावा अशी कल्पना करितां येणार नाहीं.

जटायूनें रावणाचा रथ भग्न केल्याचें वर्णन रामायणांत आहे परंतु तोहि रथ नसावा अशी शंका येते ती वेगळीच. कारण लंकेंतून रावण मारीचाकडे प्रथम ज्या वाहनानें आला व त्याला घेऊन पंचवटीकडे गेला त्याच वाहनांतून त्यानें प्रथम सीतेला नेली. त्या रथाचें वर्णन कामग ( ३।३५।६ ) म्हणजे यथेच्छ चालणारें असें केलें आहे. वाहन बोलून चालून जड असल्यामुळें येथील इच्छा चालविणाऱ्या यजमानाची हें उघड आहे. या रथाला खर जोडले असले तरी त्यांचीं मुखें पिशाचाप्रमाणें असल्याचें वर्णन आहे (पिशाच वदनैः ३।३५।६). आधीं गर्दभ व मुख पिशाचासारखें असा प्राणी कसा कल्पावयाचा? अर्थात् हा रथ म्हणजे खरोखरचा रथाकार विमान असलें पाहिजे व त्याला पुढें अश्वस्थानीं पिशाचमुख गर्दभांचीं कृत्रिम चित्रें जोडलीं असलीं पाहिजेत असें वाटतें. मारीचाचे आश्रमांतून रावण त्याला घेऊन याच रथांतून बाहेर पडल्याचे वेळीं त्याला ( ३।४२।९ विमानमिव ) विमानाची उपमा दिलेली आहे; व ती विमानाचे कल्पनेला बाधक आहे, तथापि त्याचें आकाशगामित्व सांगितलें असल्यामुळे या उपमेचें महत्त्व

नाहीं. फार तर विमानाप्रमाणें आकाशगामी असा तो रथ होता असे म्हणूं सीतेला या रथांत बसविल्याबरोबर रथ घेऊन त्यानें आकाशांत उड्डाण केल्याचें स्पष्ट सांगितलें आहे (३।४९।२१,२२). आकाशांतून जात असलेल्या या रथाचा वेग बाणाप्रमाणें ( शरश्चापादिवच्युतः ३।५४।७ ) असल्याचें वर्णन आहे त्या वरूनहि तो रथ नसून विमान असल्याचें दिसून येतें. युद्धाचे प्रारंभीं रावणाचा बंधु बिभीषण रामाकडे आला तो विमानांतून आल्याचें तेथील वर्णनावरून दिसतें ( ६।१९,१,२ ). म्हणजे रावणाकडेच फक्त एक विमान होतें व इतर कोणाकडे नव्हतें किंवा इतरांना त्या कलेची माहिती नव्हती असें म्हणतां येत नाहीं. कारण यावेळीं बीभीषण रावणाशीं कलह होऊन आला असल्यामुळें रावणाचें एकच विमान असल्यास तें त्याला मिळणें शक्य नव्हतें, अर्थात् तें त्याचें स्वतःचें विमान असलें पाहिजे. मारीचाला घेऊन रावण जनस्थानाकडे येत असतां वाटेंत अनेक विमानें त्याला भेटल्याचें वर्णन ( ३।३५।१९ ) आहे त्यावरून तेव्हां विमानाची कला पूर्णत्वाला गेल्याचें व तिचा पुष्कळ प्रसार झाला असल्याचें स्पष्ट होतें.

अशा रीतीनें सीतेला घेऊन रावण विमानांतून भरदिवसा प्रकटपणें घेऊन गेल्याचें सिद्ध होत असल्यामुळें तो तिला गर्दभरथांतून घेऊन लंकेपर्यंत गाडीमार्गानें गेला; लंकेपर्यंतचा त्याचा मार्ग गुप्त होता; वगैरे ज्या. अय्यर यांच्या कल्पना निराधार होत.

## विंध्याद्रि व दंडकारण्य

कोणत्याहि स्थळा-विषयीं निश्चय करावयाचा म्हणजे प्रथम इष्टस्थलाशीं संबद्ध असलेलीं कोणतीं तरी निर्विवाद स्थलें शोधून काढावीं लागतात व मग त्याचे धोरणानें-पुढील शोधन करितां येतें. लंकेच्या स्थळनिश्चयाचे कामीं या दृष्टीनें विंध्याद्रीचें महत्त्व आहे व तो पर्वत असल्यामुळें त्याचें स्थळांतर होण्याचा संभव नाहीं या साठीं तें निर्विवाद स्थळ आहे. रामायणांत विंध्याद्रीनिमित्त फार घोंटाळा झालेला आहे. सीताशुद्धर्थ्य किष्किंधेहून दक्षिणेकडे गेलेल्या वानरांला वाटेंत विंध्याद्रि लागल्याचें व त्यालगत समुद्र असल्याचें रामायणांत वर्णन आहे. हिंदुस्थानचे दक्षिणेला समुद्र असला तरी तो विंध्याद्रि जवळ नाहीं या साठीं तो दुसरा विंध्याद्रि म्हणवा किंवा दक्षिणेकडे विंध्याद्रि आहे या लोकवार्तेला अनुसरून वानरांनीं दक्षिणेकडे असलेल्या पर्वताला चुकीनें विंध्याद्रि म्हटलें असावें अशी आम्ही लंकास्थळ निश्चयाचे वेळीं कल्पना सुचवून संगति लाविली आहे ( रा. स. द्वि. खं. पृ. १८८ ). परंतु न्या. अय्यर यांनीं विंध्याद्रीचा प्रश्न वेगळया प्रकारें सोडविला आहे. त्यामुळें त्यांना दोन विंध्याद्रींची कल्पना करावी लागली नाहीं व समुद्राची अडचण वाटली नाहीं. किष्किंधेहून सीताशुद्ध्यर्थ दक्षिणेकडे गेलेले वानर-विंध्याद्रि ओलांडून पुढें गेले तरी त्यांना वाटेंत नर्मदा लागल्याचें रामायणांत सांगितलेलें नाहीं या वरून त्यांनीं नर्मदेच्या

उत्तरेला व विंध्याचे दक्षिणेला लंका ठरविली आहे. न्या. अय्यर यांच्या कल्पनेमुळें विंध्याद्रीचा घोंटाळा चुकला तरी दुसरा घोटाळा उपस्थित होत आहे तिकडे त्यांचें लक्ष गेलेलें नाहीं. यासाठीं तो कोणता हें प्रथम पाहूं.

दंडकारण्याची मर्यादा रामायणांत विंध्य व शैवल यांमधील प्रदेश अशी सांगितलेली आहे ( ७।७९।१६ ) तथापि ही मर्यादा रामायण कालची नसून प्राचीनकाळीं ती विषयीं जी समजूत होती तिचा तो केवळ अनुवाद होय हें विसरतां नये. रामायण कालीं ही मर्यादा सर्व बाजूंनी वाढत गेली असल्याचें आम्ही समालोचनेंत दाखविलें आहे ( द्वि. खं. पृ. १५९ ) इक्ष्वाकूचा पुत्र दंड याचे नांवानें तें अरण्य प्रसिद्ध होतें व इक्ष्वाकु आणि राम यांमध्यें बराच काल लोटला होता. रामायणांतील दंडकारण्याविषयींच्या कथेवरून ( ७।७९ ) विशेषतः तींतील "पांसुवर्षा"चे वर्णनावरून दंडराजाचे वेळीं ज्वालामुखीचे स्फोटामुळें तो प्रदेश निर्जन झाला असावा असें वाटतें. राक्षसांचा उपद्रव हें तर एक कारण होतेंच. असो दंडकारण्याच्या वरील मर्यादेपैकीं विंध्य ही मर्यादा कळली आहे व शैवल कोणता हें कारण नसल्यामुळें आम्ही त्यावेळीं ठरविलें नाहीं. विंध्याचे दक्षिणेकडे हा पर्वत कोठें तरी असेल अशी समजूत करून आम्हीं दुसरीकडे वळलों. न्या. अय्यर यांनीं दमोह जिल्ह्यांत पैशुनी नदीशीं असलेला पन्ना डोंगर हा प्राचीन शैवलपर्यंत ठरवून तेथून खालीं विंध्यापर्यंत दंडकारण्याची मर्यादा आंखली

आहे. हा प्रदेश सुमारें २५०० चौरस मैल आहे ( २५X १००) (पृ. १०३).रामायणांत दंडकारण्याची मर्यादा सांगितली त्या निमित्त त्याचा उल्लेख वरील स्थलीं " विंध्य शैवलयो· र्मध्ये " असा एकदांच झाला आहे. याशिवाय त्याचें वर्णन आलेलें नाहीं. शैवल या नांवावरून त्यावर शेवाळ असावी व पन्ना डोंगरावर अशी असते यासाठीं त्याचें पूर्वीचें नांव शैवल पडलें असावें अशी त्यांची कल्पना आहे. त्यांची कल्पना युक्त आहे पण प्राचीनकालचे स्थलनिर्णयाचे कामीं हा आधार काय उपयोगाचा ? यामुळें शेवाळीच्या आधारावर पाऊल टाकल्यास ज्याप्रमाणें पतन अपरिहार्य असतें त्याप्रमाणें त्या. अय्यर यांजवर येथें पाळी आली आहे. उत्तरे कडून दक्षिणेकडे जाणारा मनुष्य वाटेंतील गांव नद्या वा पर्वत यांचीं नांवें त्याच क्रमानें साहजिक सांगतो व रामायणांत तदनुसार विंध्य व शैवल अशीं नावें सांगितलीं आहेत. शैवल आधीं असता तर " मध्ये शैवल विंध्ययोः " असें म्हटलें असतें. म्हणजे येथें छंदाची अडचण संभवत नाहीं हें उघड आहे. हा व्यवहार इतका स्वाभाविक आहे कीं दंडकारण्या विषयीं माहिती सांगतांना त्या. अय्यर यांनीं पन्ना डोंगर हा शैवल पर्वत ठरविल्यामुळें तो क्रमशः अधीं येऊन पन्ना व विंध्याद्रि यांमधील प्रदेश असें वर्णन केलें आहे (पृ. १०३ ). हा क्रम रामायणाचे अगदीं उलट आहे. दंडकारण्याची प्राचीन मर्यादा रामायण कालीं वाढली असल्यामुळें पन्ना डोंगर व त्याचे उत्तरेकडील कांहीं प्रदेशहि या वेळीं दंडकार-

ण्यांत येत असे हें आम्हाला संमत आहे. तथापि, विंध्याद्रीचे उत्तरेकडे दंडकारण्य असल्याचें जें रा. अय्यर यांचे व्याख्येवरून दिसतें तें चुकीचें आहे. अत्रीचे आश्रमांतून निघाल्यावर राम वाटेंत विराधाचा वध करून शरभंगाश्रमीं आले. भवभूतीनें विराधसंवादाचें स्थान "विंध्याटवी मुखे" असें (उ. रा. च. अंक १ श्लोक २४ पुढील गद्य) वर्णिलें आहे व हें वर्णन आपल्या कल्पनेला पोषक म्हणून रा. अय्यर यांनीं येथें उद्धृत केलें आहे. येथील विंध्याटवी शब्द दंडकारण्य याच अर्थी कवीनें योजिला असून त्यांत प्रवेश केल्यावर प्रथम विंध्याद्रि लागतो म्हणून हें नांव पडलें असावें असें वाटतें. रामायणकालींच ही मर्यादा वाढली तरी पूर्वीची संज्ञा तशीच राहिली व ती भवभूतीनें योजिली. ती वरून दंडकारण्याची मर्यादा आम्हीं म्हणतों त्या प्रमाणें वाढलेली कवीला पटल्याचें सिद्ध होईल; ती वरून शैवल ही उत्तरेकडे नवीन मर्यादा काढितां येणार नाहीं किंवा ती कवीला संमत होती असें अनुमान करितां येणार नाहीं.

शरभंगाश्रमानंतर सुतीक्ष्णाश्रम व पुढें अगस्त्याश्रम आणि नंतर पंचवटी असा रामाचे प्रवासाचा क्रम आहे. यांतील अगस्त्य मुनींची कथा प्रसिद्ध आहे व त्या निमित्त त्याचा आश्रम विंध्याद्रीच्या दक्षिणेला मानणें भाग आहे. रामायणांत ही कथा विस्तारानें दिली नसली तरी तिचा उल्लेख रामाचे भाषणांत आला आहे (३।११।८६). वाढूं लागलेला विंध्याद्रि अगस्त्यमुनीचे आज्ञेनें थांबला व ते स्वतः त्याचे दक्षिणेकडे

जाऊन तेथेंच आश्रम करून राहिले असें या कथेचें स्वरूप आहे. अगस्त्य हें नाव वांशिक असून त्या वंशांतील पुरुष सर्वच अगस्त्य म्हटले गेले असले तरी ज्या पुरुषानें विंध्याद्रीची वाढ थांबविल्याचा लौकिक आहे तो रामाचे पूर्वीचा हें रामाचे भाषणांत आलेल्या कथेच्या उल्लेखावरून सिद्ध होत आहे. अर्थात् अगस्त्याश्रम विंध्याद्रीचे उत्तरेला न येतां दक्षिणेला येतो. न्या. अय्यर यांच्या कल्पनेप्रमाणें रामायणांतील लंकादि सर्वच स्थानें विंध्याद्रीचे उत्तरेला येऊं पहात आहेत.

सीताशुद्ध्यर्थ दक्षिणेकडे गेलेले वानर ऋक्षबिलांत शिरून गोंधळले असतां तेथें त्यांना एक तापसी भेटली व तिनें त्यांना बाहेर आणून सोडल्याची कथा रामायणांत आहे. या कथेंत तापसीला मारुतीनें आपली माहिती सांगितल्याचें वर्णन असून त्यांत पुढील श्लोक आहे.

राजा वानरमुख्यानां येन प्रस्थापिता वयम् ।
अगस्त्यचरितामाशां दक्षिणां यमरक्षिताम् ॥४।५२।७

यांत दक्षिण दिशेला अगरस्त्यचरिता असें म्हटलें आहे. येथें वरील कथा स्पष्टपणें सांगितलेली नसली तरी अभिप्रेत आहे हें सांगावयास नको. कारण उत्तरच्या अपेक्षेनें कोणताहि प्रदेश दक्षिणेकडील होऊं शकेल व त्या प्रमाणें विंध्याद्रीचे उत्तरेकडील प्रदेश अयोध्येच्या अपेक्षेनें दक्षिणेकडील असला तरी ती कांहीं अगस्त्यचरित दिशा होणार नाहीं. अगस्त्यचरित म्हणजे अगस्त्यांनीं वास केलेली. न्या. अय्यर यांचा अगस्त्याश्रम तर विंध्याद्रीचे उत्तरेला आहे. विंध्याचे

दक्षिणेला अगस्त्याश्रमाची कल्पना केली तरी वरील वचन विंध्याद्रींतील ऋक्षबिलांत वानर शिरून गोंधळले असतां तेथें म्हटलेलें आहे म्हणजे तो प्रदेश विंध्याद्रींतच येतो. अर्थात् तेथें कोणताच आश्रम असणें शक्य नाहीं मग अगस्त्याश्रम कोठला असणार व अगस्त्याश्रम नसेल तर ती दिशा अगस्त्य-चरित कशी होणार ?

दुसरें असें कीं जांबवानाचा भाऊ धूम्र म्हणून सीताशुद्धयर्थ बाहेर पडलेल्या वानरांमध्यें सांगितलेला आहे (४।३९।२०). याचें वर्णन रावणाचे चारानें नर्मदेचें उदक प्राशन करून ऋक्षवान् पर्वतावर राहणारा असे (६।२७।८) केलें आहे. अर्थात् त्याचें निवासस्थन नर्मदेशीं दिसतें. म्हणजे त्या. अय्यर यांनीं लंका जेथें ठरविली आहे त्याचे दक्षिणभागांत तो रहात असला पाहिजे. मग सुग्रीवाचे साहाय्यार्थ नर्मदेच्या उत्तरभागीं येणाऱ्या या धूम्राला मध्यभागांतील लंकेचें स्थान माहीत नसावें हें आश्चर्य नव्हे काय ? तेव्हां नर्मदेच्या उत्तरेला लंका होती ही कल्पना स्वभावतः विसंगत आहे.

## लेखांक ४ था

# सिंहलद्वीपाची लंका झाली

सध्यां सीलोन म्हणून प्रसिद्ध असलेल्या देशाचें सिंहलद्वीप असें दुसरें नांव आहे. हें नांव प्राचीन कालचें असून गुणाढ्याचे ( म्हणजे खि. पू. सुमारें ४ थें शतक ) काळा इतका त्याचा थोडा थोडा इतिहास उपलब्ध आहे. तथापि तो सिंहलद्वीप या नांवानें आहे. रावणाची लंका म्हणून रामायणांत प्रसिद्ध असलेलें स्थान तें हें द्वीप होय अशी लोकांमध्यें तर रूढ समजूत आहे. भोजाचे रामायण चंपूपर्यंतचे संस्कृत वाङ्मयांत लंका व सिंहलद्वीप यांमधील अभेद कल्पनेला आधार मिळत नाहीं. या कल्पनेचा उद्भव कसा व कोणत्या कालीं झाला याविषयीं न्या. अय्यर यांनीं विवेचन करून आपलें निश्चित मत सांगितलें आहे त्याविषयीं आतां विचार करूं. या द्वीपाचें सध्यां प्रचलित असलेलें सीलोन हें नांव प्राचीन नव्हे या विषयीं वाद नाहीं. या द्वीपाचें सिंहलद्वीप हें नांव प्राचीन असून त्याची अकराव्या शतकांत लंका बनली व यासाठीं खरी लंका कोणती हें ठरविण्याचा प्रयत्न प्रस्तुत प्रबंधांत न्या.नीं केला आहे. लोकांचे समजुतीकडे पाहतां मूळ लंकेला सिंहलद्वीप हें नांव रामायण काळानंतर केव्हां तरी मिळालें असावें असें दिसतें. म्हणजे सिंहलद्वीपाचें लंका हें नांव प्राचीन का अर्वाचीन हा येथें प्रश्न आहे. या दृष्टीनें सिंहलद्वीप या नांवाचें प्राचीनत्व सिद्ध करणें अवश्य असून तो प्रश्न

सोडविण्याचे दृष्टीनें इ. पू. चौथ्या शतकापर्यंत बराबरी न्या. मागें आले आहेत. रामायण काळ खि. पू. बराबरी २५०० वर्षांइतका आमचे मतें आहे. हा काळ वादग्रस्त धरिला तरी खि. पू. १००० च्या मागें तो काल न्यावा लागेल याविषयीं तरी वाद नाहींना ! म्हणजे गुणाढयाचे कालापूर्वी या द्वीपाचें नांव सिंहलद्वीपच होतें अशा विषयीं प्रमाणें न्या. नीं देणें क्रमप्राप्त होतें; पण त्यांनीं तसें केलें नाहीं. गुणाढयांचा काळ म्हणजे कांहीं रामायण काळ नव्हे. अर्थात् लोकांचे समजुतीवर त्यांनीं जो आक्षेप घेतला तो त्यांना सिद्ध करितां आला नाहीं हें उघड आहे.

लंकेविषयीं लोकांत जी प्रचलित समजूत आहे तिजवरील न्या. अय्यर यांच्या आक्षेपाचें निरसन मागील लेखांकांत साकल्यानें केलें असलें तरी त्यावरून लोकांतील समजूत बरोबर आहे असें निश्चितपणें म्हणतां येणार नाहीं. कारण लंकेचा निश्चय रामायणांतील वर्णनाशीं वस्तुस्थितीचा मेळ दाखविल्यावर करितां यावयाचा आहे. असा प्रयत्न समालोचनेच्या द्वितीय खंडांत आम्ही केलेला आहे. तथापि न्या. अय्यर यांनीं सध्यां जेथें लंका ठरविली आहे तेथेंहि रामायणांतील वर्णनाप्रमाणें वस्तुस्थिति असल्याचें त्यांनीं आपल्या प्रबंधांत दाखविलें आहे व यामुळें रावणाची लंका कोणती ? हा प्रश्न कांहीं सुटला असें होत नाहीं. तेव्हां न्या. अय्यर यांनीं हा मेळ आपल्या प्रबंधांत कसा दाखविला आहे याचें परीक्षण करून हा प्रश्न सोडविणें भाग आहे. त्यांचे प्रतिपादनांत

दोष राहिले असतील तर त्यांचा प्रयत्न अग्राह्य समजून प्रचलित समजुतीला मान्यता देणें उचित होईल हें सांगावयास नको.

## लंका आणि समुद्र

रावणाचे लंकेंत जाण्याकरितां मधील समुद्रावर नळानें सेतु बांधिला व त्यावरून राम आणि त्यांची वानरसेना चालत लंकेकडे गेली अशी कथा आहे. न्या. अय्यर यांनीं जेथें लंका ठरविली आहे तो प्रदेश नर्मदेच्या उत्तरभागीं मध्य हिंदुस्थानांत असल्यामुळें श्रीमंत सरदार किबे यांचे प्रमाणें त्यांनाहि समुद्राची अडचण वाटून ती त्यांनीं युक्तीनें दूर केली आहे. त्यांची लंका हिराण वगैरे नद्यांचें त्रिकोणांत असून तो प्रदेश सिहोरा हवेलीचे पश्चिम भागांत येतो. हा प्रदेश सुमारें ५० चौरस मैलांचा आहे. याचे दक्षिणेला लंका येत आहे. मोठमोठे तलाव असल्यास त्यांना, सागर, समुद्र वा अंबुधि म्हणण्याची आपले लोकांची संवय प्रसिद्ध आहे व तीस अनुसरून या प्रदेशाला सागर असें नांव स्वाभाविक पडलें अशी न्या. अय्यर यांनीं येथें कल्पना चालविली आहे (पृ. ३६). न्या. अय्यर यांची ही कल्पना रम्य आहे पण तिला कसला तरी आधार आहे काय? रामायणकालीं या प्रदेशाला समुद्र म्हणत होते काय हा प्रश्न आपल्यापुढें आहे. न्या. अय्यर यांना जें स्थान लंका वाटलें त्याशीं हा प्रदेश संलग्न आहे म्हणून समुद्र म्हणावयाचा; आणि या समुद्रांत तें

स्थान येतें म्हणून ती लंका म्हणावयाची असा हा प्रकार आहे. सध्यां हा प्रदेश जलमय नाहीं आणि या नद्या कितीहि मोठ्या असल्या तरी त्यांचे दक्षिणेकडील नर्मदेच्या अपेक्षेनें सामान्यपणें लहानच होत. पावसांत फार तर पूर येत असतील. गंगा, सिंधु यां साऱख्या मोठ्या नद्यांचे प्रवाह बदलतात हें खरें; तथापि या नद्यांचे प्रवाह बदलले असतील हें संभवत नाही; आणि ते प्रवाह प्राचीन कालपासून सध्यां आहेत तेथेंच आहेत. हें लक्षांत घेतले म्हणजे त्यांची वाढ सागराप्रमाणें विशाल होणें शक्य नाहीं. दुसरें असें कीं पावसाळा ओसरल्यानंतर शरदृतुंत सीताशुद्धीचा प्रारंभ झाला अर्थात् त्यावेळीं या नद्यांला पूर आल्याची कल्पनाहि संभवत नाहीं. बरें; वानर प्रथम गेले त्यावेळीं त्या नद्या भरलेल्या होत्या असें मानिलें तरी मागाहून राम आल्यावेळीं तरी त्यांतील पाणी कमी झालें असलें पाहिजेच. नंतरहि तें तरून जाण्याला अशक्य म्हणून त्यावर सेतु बांधण्याची आवश्यकता वाटावी हें शक्य आहे काय? प्रारंभींचे प्रवासांत राम बरोबर सीतेला घेऊन मोठें पाणी असलेल्या नद्या तरून गेल्याचें ( नदीस्तीर्त्वा बहूदकाः ३।७।२ ) वर्णन आहे. वानरांला हा प्रदेश जलमय पाहून सागराचा भास झाला अशी कल्पना केली तरी मागाहून आलेल्या रामादिकांलाहि सागर व इतर जलाशय यांतील भेद कळूं नये काय? मोठ्या जलाशयांला सागर म्हणण्याची आमचे लोकांची संवय येथें न्या. अय्यर यांनीं पुढें केली आहे पण तिला आधार काय?

म्हैसूरला कृष्णसागर व शिवसमुद्र आणि रायगडावर गंगासागर हे मोठे जलाशय असून त्यांना सागर नांव आहे हें खरें आहे; पण हीं नांवें कशीं असलीं तरी आधुनिक होत. त्यांवरून प्राचीन कालचे स्थलांविषयीं निश्चय कसा करावयाचा ? रामायण कालीं मोठ्या जलाशयांला सागर म्हटलें जात असल्याचीं उदाहरणें येथें हवीं आहेत; तशीं न्या. अय्यर देऊं शकतील काय ? आम्हांला माहीत आहे कीं प्राचीन ग्रंथांत पुष्कळ स्थलीं वर्णनें अत्युक्तीनें केलेलीं असतात. कुंभकर्णाचे शरीराचा विस्तार शंभर धनुष्यें इतका रामायणांत सांगितला आहे हा त्यांतीलच एक प्रकार होय तथापि तो मनुष्यप्राणी होता व राक्षस हा त्यांतीलच एक भेद आहे हेंहि तेथील पूर्वापर संदर्भावरून कळून येतें. अर्थात् मनुष्य किती भव्य असूं शकेल याविषयीं जें अनुमान आपणांस करितां येतें तेंच तेथें घ्यावयाचें आहे हें कोणाच्याहि लक्षांत येईल. अत्युक्तीचें वर्णन असलें तरी अशा रीतीनें त्या स्थलीं ग्राह्यांशाची कल्पना करून देण्याची सोय असते. अलीकडील काळांत उपलब्ध असलेल्या सागर वाचक नांवांत अशी सोय आहे कीं तीं कांहीं तरी विशेष नांवानें युक्त आहेत. केवळ सागर असें सामान्य नांव आढळत नाहीं. केवळ सागर असें प्रान्ताचें नांव आहे पण सागरप्रांत म्हटल्यानें त्याचें समुद्रत्व नष्ट होतें. हाच प्रकार निर्णयसागर, ज्ञानसागर, या मुद्रणालयाचे व विद्यासागर या मनुष्याचे नांवासंबंधीं समजावयाचा आहे. न्या. अय्यर यांनीं आपल्या लंकेशीं सागर

असल्याचा जो देखावा निर्माण केला आहे तो अशा प्रकारें काल्पनिक आहे. आतां रामायणांत वर्णिलेला सागर कसा होता हें पाहूं.

रामायणात सागराचें वर्णन स्पष्ट शब्दांत केलें असून तेथें केवळ जलाशयाचा संशयहि येत नाहीं. "तिमिनक्र झषाकुलम" असें त्याचें वर्णन पुष्कळ स्थलीं लिहिलें असून रामाची सेना समुद्रावर येऊन पोंचली त्याचें वर्णन वेळेवर आली असें केलें आहे ( ६।४।९७ ). पंचवटींतील वर्णनाचे वेळीं नदीचें तीर ( ३।१७।१ ) म्हटलें आहे. वेला व तीर हा विवेक येथें लक्षांत ठेविला पाहिजे. समुद्राशीं आल्यावर त्याची गर्जना प्रथम ऐकूं येते व त्याप्रमाणें ( ६।४।९५ ) तेथें सांगितलें आहे. समुद्राचे लाटांचें येथील वर्णन इतकें सुंदर आहे कीं तें मूळांतच वाचावें असें वाचकांस आम्ही सांगतों. जलाशय कितीहि विशाल असला तरी त्यावर अशा प्रकारें लाटा उत्पन्न होणें शक्य नाहीं हें येथें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. रावणाचें स्थान वानरांला प्रथम संपातीनें सांगितलें त्यावेळीं त्यानें "उपायो पश्यता कश्चिल्लंघने लवणांभसः।" ४।५८।३३ असें म्हटलें आहे. लवणांभस् शब्दानें समुद्राचे खाऱ्या पाण्याचा बोध होतो. हा शब्द संपातीचे भाषणांत आला आहे हें विशेष आहे. कारण सर्वांत उंचावरून आपली गति असल्याचें त्यानें प्रथम सांगितलें ( ४।५८।२८ ) आहे. अर्थात् वानरांनीं मोठा जलाशय पाहून तो समुद्र वाटला व तोच प्रयोग पुढें सुरू झाला असें समजण्याचें कारण नाहीं. जलाशय

मोठा म्हणून समुद्रतुल्य वाटला तरी त्याची रुचि कधीं बद-लून खारट होणार नाहीं. "लवणांभस्" या शब्दाचे प्रयोग अन्यत्रहि कित्येक स्थलीं आले आहेत (५।१।४९; ५।१।७९; ५।१।१२५; ५।१।१८७; ६।२४।३१ ). यापेक्षां महत्त्वाचें प्रमाण चद्राचे उदयास्तानिमित्त समुद्राला येणाऱ्या भरतीचें होय. पुढील श्लोक पहाः--

चंद्रोदयसमाधूतं प्रतिचंद्रसमाकुलम् ।। ६।४।११२.

हें वर्णन राम वानर सेनेसह समुद्राचे उत्तरतीरीं आले त्या-वेळचें आहे. कितीहि मोठा जलाशय असला तरी त्याला चंद्रा-निमित्त भरती येणें शक्य नाहीं. तेव्हां न्या. अय्यर यांनीं ठर-विलेल्या लंकेशीं कदाचित् मोठ्या जलाशयाची कल्पना उभा-रतां आली तरी तो समुद्र होता असें वाटणें अथवा म्हणणें संभवत नाहीं.

## लंका-कलंगी जवळची

न्या. अय्यर यानीं शोधून काढिलेली लंका इंद्रण डोंगरा-वर असून तो १९३२ फुट उंच आहे. या डोंगराचे तीन बाजूंनीं हिराण नदीचा वेढा असून उत्तरेकडील बाजू मोकळी आहे; पण तिकडून येण्याला कैमूर डोंगराचे उत्तरेकडील भागीं असलेल्या कटस खिडीतून येण्याचा एकच मार्ग आहे व प्राचीनकाळीं तो रावणानें गुप्त ठेविला होता असें न्या. चें म्हणणें आहे. ( पृ. ५५ ) या मार्गानें यावयाचें झालें तरी कटस खिडीपासून इंद्रणपर्यंतचा मधील भाग जलमय अस-

ण्याचा बराच संभव आहे ( पृ. ४७ ). ऋक्षबिलांतून बाहेर पडल्यावर हा जलाशय वानरांनीं प्रथम पाहिला ( पृ. ५६ ) व हिंदु लोकांच्या पद्धतीप्रमाणें या जलाशयाला सागर म्हणत असावे अशी त्यांची कल्पना आहे. ( पृ. ३६ ) यांतील सागराविषयींची न्या. अय्यर यांची कल्पना निराधार असल्याचें पूर्वी दाखविलें आहे; आतां इतर कल्पना मूळाशीं जमतात काय तें पाहूं.

कूट म्हणजे शिखर; अर्थात् त्रिकूट म्हणजे तीन शिखरें असलेला डोंगर. इंद्रण डोंगर तीन बाजूनीं उभा सुळकी-सारखा ( Steeply scarped on three sides पृ. १९ ) आहे असें न्या. नीं त्याचें वर्णन केलें आहे. उत्तरेच्या बाजूला मात्र याचा चढाव थोडा सोपा आहे. या वर्णनावरून या डोंगराला शिखरें तीन नसून एक आहे. तीन बाजूनीं तो अगदीं उभा असला तरी तीं कांहीं तीन शिखरें होणार नाहींत.

इंद्रण जवळ त्याचे ईशान्येला एक टेकडी आहे ती न्या.चे मतें पूर्वीचा सुवेलाचल. सुवेल व इंद्रण पायथ्याशीं एक-मेकाला भिडलेले आहेत.

रामायणावरून सुवेलाचल समुद्राशीं भिडलेला दिसतो. सुवेल हें नांवहि ( वेला—समुद्रतीर ) त्याचें द्योतक आहे. यासाठीं रामाची सेना प्रथम सुवेलावर उतरली व त्याचे शिखरावर चढल्यावर त्यांना लंकेची शोभा पाहतां आली ( ६।३८ ). सुवेलावांचून त्रिकूटावर चढण्यास दुसरा मार्ग

तेथें दिसत नाहीं व त्रिकूटाचा समुद्राशीं साक्षात संबंध येत नाहीं. न्या. अय्यर यांचा त्रिकूट व सुवेल पायाशीं भिडलेले असले तरी समुद्राला लागून आहेत व समुद्रांतून परभारें त्रिकूटावर चढण्याची सोय आहे. म्हणजे अर्थदृष्ट्या त्रिकूटहि येथें खरोखर सुवेलाचल आहे. न्या. चे सुवेलावरून उतरून त्रिकूटावर लागलीच चढून लंका गाठतां येते; तर रामायणांतील सुवेलावरून राम त्रिकूटावर जाण्याकरितां खालीं उतरले व तेथून त्रिकूटापर्यन्त येऊन लंका गांठण्यास बराच वेळ लागला ( दीर्घेण कालेन ६।४१।३० ) ( ६।४१।२३ ) सुवेलाचे शिखराचा व्यास न्या. नीं अर्धा मैल सांगितलेला आहे ( पृ. २९ ) तर रामायणांत तो दोन योजनें सांगितला आहे ( ६।४०।१ ). इंद्रणाचे शिखराची लांबी न्या. नीं एक मैल दिली आहे; ( पृ. १९ ) तर त्रिकूटाचा विस्तार रामायणांत १०० योजनें–म्हणजे न्या. चे हिशेबाप्रमाणें ११॥ मैल–सांगितला आहे ( ६।३९।१९ ) या शिखरावरील लंकापुरी " शतयोजनविस्तीर्णात्रिंशयोजनमायता " ( ६।३९।२० ) होती. लंकेंतील रावणाचा वाडा सहस्र स्तंभाचा होता ( ६।३९।२३ ). पर्वत व नद्या यांच्या सीमा सहसा बदलत नाहींत व या दृष्टीनें पूर्वीचा विशाल त्रिकूट मरून लहान झाला अशी येथें कल्पना करितां येण्यासारखी नाहीं. लंकापुरी भोंवतीं चारी बाजूंनीं कोट, त्यामुळें खंदक असून आंत येण्यास चारी बाजूंना चार महाद्वारें होतीं. खंदकावरून आंत येण्यास संक्रम ( सांकव–लांकडी पूल ) होते. शत्रु आल्यास हे

संक्रम यंत्रांनीं काढून घेण्याची व्यवस्था केलेली होती (६।३।११–२०) लंकेभोंवतीं चार कोट सांगितले आहेत त्यांतील एक नद्यांचा व पर्वतांचा असून दोन कृत्रिम होते. यांतील कृत्रिम कोट दीर्घ कालांत पडून गेले असतील अशी कल्पना येथें करितां येईल. पण नद्या व पर्वत यांचे कोटांना तर भंग नाहींना ? नाहीं म्हणावयास न्या. अय्यर यांचे लंकेभोंवती तीन बाजूंनी मात्र हिराण नदीचा वेढा आहे. पर्वताचा कोट तर मुळींच नाहीं. न्या. चें लंकेचें प्रवेशद्वार उत्तरेकडे संभवतें; तीन बाजूंनीं डोंगराची रचना अगदीं उभी असल्यामुळें तिकडे प्रवेशद्वार ठेवण्याचें कारण नाहीं व शत्रूचा प्रवेश होणें शक्य नाहीं. रामाची सेना सुवेलाचलीं आल्याचें कळतांच रावणानें लंकापुरीचे चारी द्वारांवर पुरीचे रक्षणाची व्यवस्था केल्याचें सांगितलें आहे (६।३७। १०–१२). यांपैकीं उत्तरद्वार हें प्रमुख असून त्यावर स्वतः रावण येऊन बसत असे. रामाच्या वानर सेनेनें लंकेभोंवतीं वेढा घालून चारी द्वारांवर चार सेनापतींची योजना केल्याचे वर्णन आहे. (६।४१।३३–४०) न्या. अय्यर यांनीं लंकेभोंवती कल्पिलेला नादेय-कोट (हिराण नदीचा) त्रिकुटाचे भोंवतीं आहे. त्याला वेढा घालणें इष्ट नाहीं व अवश्य नाहीं. रामायणांतील कोट सुवेलाचे पुढें व त्रिकुटाचलीं आहे तर न्या. चा कोट या दोघांचेहि बाहेर आहे. त्यांचे लंकेला प्रवेशद्वार उत्तरेला संभवतें पण तें समुद्राचे बाजूला आहे व यामुळें शंका येते कीं, समुद्रावर सेतु बांधून लंकेंत प्रवेश करावयाचें ठरल्यावर

रामांनीं तो थेट त्रिकूटाचलापर्यंत कां बांधिला नाहीं ? सेतु सुवेलाचलापर्यंत नेऊन तेथून त्रिकूटाकडे येण्याचा हा द्राविडी प्राणायाम कां केला ? कारण न्या. न्या महेंद्रद्वारापासून सुवेला-पेक्षां त्रिकूट जवळ आहे हें त्यांनीं दिलेल्या नकाशावरून सहज लक्षांत येण्यासारखें आहे. तेव्हां त्यांनीं ठरविलेल्या लंकेला स्वतःचे कल्पनेवांचून कोणताच आधार दिसत नाहीं.

## पंपा

न्या. अय्यर यांनीं दमोह जिल्ह्यांतील सिंग्रोगड हा ऋष्य-मूक ठरविला असून तेथें एक किल्ला आहे. या किल्ल्याचे पश्चिमेला प्राचीनकाळीं एक मोठा तलाव होता अशी लोक-वार्ता असल्याची दमोह गॅझि. मध्यें नोंद आहे व न्या. नीं तिचें अवतरण घेतलें आहे. (पृ. ६१) या नोंदीवरून हा तलाव सुमारें ३५ चौरस मैल असावा असें कळतें. सध्या येथें तलाव नसून २८ खेडीं वसलेलीं आहेत. यापुढें त्या नोंदींत त्या किल्ल्याविषयीं ऐतिहासिक वगैरे बरीच माहिती दिलेली आहे; पण सध्यां त्याविषयीं आपणाला कांहीं कर्तव्य नाहीं. वरील तलाव हेंच पूर्वींचे पंपासरोवर असावें असा न्या. चा तर्क आहे. पंचवटींतून सीताशुद्धयर्थ राम मार्ग काढीत पंपेपर्यंत आले व तेथून महेंद्रद्वारमार्गें लंकेला गेले असा त्यांचा प्रवासक्रम न्या. नीं आंखलेला आहे. पंपेपर्यंत आल्यावर पंपेचें हें ३५ चौरस मैलांचें विशाल सरोवर ओलांडून राम पुढें कसे गेले असा प्रश्न येथें उद्भवतो. हा

प्रश्न न्या. अय्यरनीं वेगळया प्रकारें सोडविला आहे. ते म्हणतात कीं पंपेपासून ऋष्यमूकापर्यंत अंतर फार मोठें असून वाटेंत मोठा बांधवाट (Causeway) किंवा सांकव ( a great distance across the पंपा and ऋष्यमूक ) आणि वाळवंटें होतीं असें अरण्यकांडाचे अंतिम श्लोकांत सांगितलें आहे व त्यावरून वरील सांकव पंपेचा होय असें अनुमान होतें ( पृ. ४५ ). पंपेपासून ऋष्यमूक फार दूर नव्हता ( not very far off ) असें रामायणावरून ३।७५।७ ( नातिदूरे ) त्यांनीं पूर्वी अनुमान केलें आहे ( पृ. ४४ ). उभयत्र अनुमानांला आधार रामायणाचा व अनुमानें तर अगदीं परस्पर विरुद्ध; पण न्या. नीं येथें कांहींही शंका घेतल्याचें दिसत नाहीं. पण आपणाला आली आहे त्यापक्षीं त्याचा विचार करूं. कारण हा विरोध न्या. चे प्रतिपादनांत नसून मूळ रामायणामध्यें येऊं पहात आहे.

ऋष्यमूक व पंपा यांमध्यें खरोखर किती अंतर होतें हें प्रथम रामायणांत दुसरें प्रमाण पाहून ठरवूं. सीता शुद्धयर्थ राम दक्षिणेकडे फिरत असतां त्यांना कबंधानें सुग्रीवाचें साहाय्य घेण्याची सल्ला दिली व त्याकडे जाण्याचा मार्ग सांगितला. त्याचे भाषणांत ( ऋष्यमूके गिरिवरे पंपापर्यंत शोभिते ३।७२।११ ) ऋष्यमूक पंपेला लागूनच असल्याचें वर्णन आहे. तसेंच पुढें राम पंपेशीं गेले ( ४।१।१ ) तेव्हां त्यांना सीतेचें स्मरण होऊन ते शोक करूं लागले असतां

लक्ष्मणानें त्यांना धीर दिला व ते दोघे पर्पेतून पलीकडे गेले (अभ्यतिक्रामत्–पंपां ४।१।१२४) असें वर्णन आहे. त्याकरितां ते संक्रमावर चढून पलीकडे गेले वगैरे येथें कांहीं सांगितलेलें नाहीं. यावरून पंपेवर सांकव किंवा पूल नसून ते तींत उतरून पायीं चालत पलीकडे गेले असें दिसतें. आतां न्या. चे सांकवाकडे वळूं.

न्या. अय्यर यांनीं आधारार्थ घेतलेला श्लोक पुढील-प्रमाणें आहे—

ततो महद्वर्त्म सुदूरसंक्रमः। क्रमेण गत्वा प्रतिकूल धन्वनम्।

ददर्श पंपां शुभदर्शकाननामनेकनानाविधपक्षिजाळ-काम्॥ ३।७५।३०॥

हा श्लोक कुंभकोण प्रतींत मिळतो. मुंबईचे प्रतींत तो थोड्या फेरानें आहे व हा फेर न्या. नीं आधारलेलें जें पूर्वार्ध त्यांत आहे. अर्थात् त्यांना इष्ट असलेले शब्द त्यांत नाहींत. या पूर्वींचा २९ वा श्लोक दीर्घछंदांतच आहे. रामायणांत बहुतेक सर्व सर्गांचे अंतीं एक अथवा दोन श्लोक दीर्घ छंदा-तील आढळतात व ते सर्व प्रक्षिप्त असल्याचें आम्ही ठरविलें आहे (रा. स. प्र. खं. पृ. २९३) अर्थात् रामायण काळचे

कोणत्याहि बाबी विषयीं विचार करावयाचा तर ते प्रमाण म्हणून ग्राह्य नव्हत हें उघड आहे. या विषयीं प्राय: सर्व शोधकांमध्यें ऐकमत्य आहे. पुनरुक्ति अथवा विसंगति यांपैकीं कांहीं तरी दोष तेथें त्या श्लोकानिमित्त उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं व असा अनुभव सर्वांना पटत असल्यामुळें ही एक वाक्यता स्वभावतःच उत्पन्न झाली आहे. येथें १९ व्या श्लोकांत राम पंपेंत उतरले ( विवेश पंपां ) असें वर्णन आहे. तर प्रस्तु पुढील श्लोकांत रामांनीं पंपा—पाहिली असें वर्णन आहे. या पूर्वीच्या श्लोकांत रामलक्ष्मणाला पंपा दिसल्याचें वर्णन असून पुढील किष्किंधाकांडाचा प्रारंभ राम पंपेपर्यंत पोंचल्यावर ( स तां पुष्करिणीं गत्वा ) असा आहे. अर्थात् पंपेंत उतरल्याचें मधील वर्णन विसंगत आहे व म्हणून प्रक्षिप्त आहे. त्यापुढील प्रस्तुत श्लोकांत पंपा दिसल्याचें वर्णन पूर्वश्लोकाशीं सुसंगत असलें तरी दुसरी विसंगति तेथें आहे. पूर्वीच्या श्लोकांत पंपा दिसल्यावर ( ३।७५।२४ ) रामांनीं लक्ष्मणाला सुग्रीवाकडे जाण्याची आज्ञा केली असें वर्णन असून त्यापुढें प्रस्तुत श्लोक येत आहे. त्याचे प्रारंभीं ' ततः ' त्यानंतर असा शब्द आहे. म्हणजे या प्रमाणें लक्ष्मणाला आज्ञा केल्यवर राम "महद्वर्त्मगत्वा" मोठा मार्ग चालून गेले व त्यांना पंपा दिसली असें तेथें विवक्षित दिसतें. प्रथम पंपा दिसल्याचें सांगितलें आहे अर्थात् पुढें बरेंच चालल्यावर पंपा त्यांना दिसावयाची का पंपेपर्यंत ते पोंचावयाचे यांतील कोणतें सयुक्तिक तें

वाचकांनीं ठरवावें. किष्किंधेचा आरंभ या दृष्टीनें सुसंगत आहे. तेव्हां मधील दोनहि श्लोक प्रक्षिप्त होत. तथापि त्या. नीं प्रमाण म्हणून दिलेले श्लोक आम्ही प्रक्षिप्त ठरविले तरी एकंदरींत त्याला आधार तर्कांवांचून अन्य नसल्यानें तो विषय विवादिक हें नाकारितां येत नाहीं. तेव्हां ते श्लोक मूळचे वाल्मीकीचे असें धरून त्यावरून काय अनुमान निघतें तें पाहूं.

प्रथम येथें हें सांगितलें पाहिजे कीं प्रस्तुत श्लोकांतील वादविषयक शब्द "सुदूर संक्रमः" हा आहे व त्या. नीं तेथें "सुदूरसंक्रमम्" असा पाठ दिला आहे. म्हणजे ही एक "गंडस्योपरि पिटका संवृत्ता" अशी नवी आपत्ति प्राप्त होत आहे. हा पाठभेद त्यांना कोठें मिळाला हें कळण्यास मार्ग नाहीं. कारण त्यांनीं कोणती प्रत आपण आधाराला घेतली आहे हें कोठें सांगितलेलें नाहीं. शब्द एक पण विभक्ति भिन्न असल्यानें तेथें अर्थाचा अनर्थ होत आहे. आमचे प्रतींतील पाठ घेतला म्हणजे तो रामाचें विशेषण होऊन त्याचा अर्थ "फार दूरवरून आलेला" असा होतो व आमचे प्रतींत त्यावर संपादक (टी. आर. कृष्णाचार्य-मद्रास-शके १८५१) महाशयांनीं (दूरादागतः) ह्या अर्थाची टीपहि दिलेली आहे. ही प्रत संपादकांनीं गोविंदराजीय प्रभृति दाक्षिणात्य टीका पाहून त्यांवरून तपासून प्रसिद्ध केली आहे व प्रस्तुत शब्दावर टीप असल्यामुळें येथें "मुद्राराक्षसा" चे

लीलेची शंका घ्यावयास नको. तेव्हां पंपेवरील सेतू विषयींची न्या. ची कल्पना फुकट होत* आहे.

न्या. नीं दिलेला पाठ घेतला - वास्तविक तसा घेणें चुकीचें होईल तथापि खरोखर त्यांना तसा पाठ कोणत्या तरी प्रतींत मिळाला असेल तर तसा त्यांनीं दाखविला पाहिजे-तरी तेथें दुसऱ्या अडचणी येतात. तो पाठ घेतला तर त्यांना इष्ट असलेला अर्थ तेथें निष्पन्न होतो हें खरें आहे; पण अड-चण येते ती वेगळी आहे. त्यापुढील शब्द " प्रतिकूल धन्व-नम् " असा असून त्याचा अर्थ " त्रासदायक वाळवंटें अस-लेला " मार्ग-असा त्यांनीं दिला आहे तो बरोबर आहे. पण मागील श्लोकांत रामांनीं पंपेंत प्रवेश केल्याचें सांगितलें आहे; अर्थात् त्यापुढें पंपेच्या पार होण्याकरितां त्यांनीं सांक-

*टीप—वरील चर्चा न्या. अय्यर यानीं जो अर्थ केला आहे त्या धोरणानें केली आहे. वास्तविक " दूर " याचा अर्थ "लांबचा, लांबीवर असलेला" असा आहे; व या अर्थाचे अनुरोधानें " सुदूर संक्रमम्. " म्हणजे " सुदूर: संक्रमः यस्मात् " " सांकव ज्यापासून लांबीवर आहे असा " असा अर्थ होतो. संक्रम म्हणजे " सांकव " असा अर्थ न घेतां गमन अर्थ घेतला व " सुदूरसंक्रमः " असा पाठ घेतला तर " दूरादागत: " असा वरील प्रमाणें अर्थ होऊन अडचण येत नाहीं. पण न्या. नीं दिलेला पाठ घेतला तर ' सुदूरसंक्रमं महद्वर्त्म" म्हणजे "सांकवापासून दूर असलेला मार्ग" असा विलक्षण अर्थ होतो व त्याची कशीच संगति लागण्या सारखी नाहीं.

वावर चढावयाचें हें क्रमप्राप्त होय व तदनुसार मूळांत "सुदूर संक्रमम्" हा शब्द आहे. पण पंपेंत उतरून सांकवावरून पलीकडे जात असतां मार्गांत वाळवंटें कोठलीं येतील ? आणि त्यांपासून त्रास कोणाला कसा प्राप्त होईल ? ही अडचण लक्षांत घेऊन असो अथवा न कळतां असो पण न्या. नीं येथें हें वर्णन पंपा ते ऋश्यमूक यांमधील मार्गाचें असल्याचें सांगितलें आहे ( पृ. ४५ ) यामुळें पंपेवर सांकव व पुढें वाळवंटें अशी कल्पना करून संगति लावतां येईल. पंपेच्या पार झाल्यावर ऋश्यमूकापर्यंतचें अंतर न्या. नीं नकाशावर सुमारें चार मैल दाखविलें आहे; आणि वाळवंटाची कल्पना या प्रदेशांत करावयाची आहे. सध्यां तर तेथें जंगल असल्याचें न्या. नीं लिहिलें आहे; आणि रामायणांत हा सर्व प्रदेश "वन" म्हणून मानला जात असल्याचे सुग्रीवाचे भाषणांत उल्लेख आहेत (४।२।६ व २६ ). मग वाळवंटें कोणत्या काळांतील समजावयाचीं ? पंपेपासून ऋश्यमूक जवळ असल्याचें वर दाखविलें आहे व या प्रसंगींहि रामलक्ष्मण पंपेंतून पार झाल्याबरोबर त्यांना सुग्रीवानें ऋश्यमूकावरून पाहिल्याचें वर्णन केलें आहे. (४।१।१२४ व ५।२।१ ) मग मधील अंतर चार मैल मानण्याला तरी काय आधार ? वास्तविक ही विसंगति वरील श्लोक प्रक्षिप्त न म्हणतां मूळचे मानिल्यानें येत आहे व ते मूळचे मानिले तर ती मूळांत उत्पन्न होत आहे असें म्हणणें प्राप्त आहे. याकरितां फार तर येथें "ततः" हा शब्द "महद्वर्त्म गत्वा"

यापुढें योजून अन्वय लावावा असें आम्हीं सुचवून ठेवितों. म्हणजे पंपेपर्यंत राम आले त्या पूर्वीच्या मार्गाचें हें वर्णन असें म्हणतां येईल व कशी तरी विसंगति टाळतां येईल. मात्र सांकव व वाळवंटें पूर्वीच्या प्रवासांत लागल्याचें ठरून पंपेवरील सांकवाची त्या. ची कल्पना सिद्धीस जाणार नाहीं; पण त्यास उपाय नाहीं.

पंपेचें संशोधन करितांना हंपी जवळची तुंगभद्रा नदी ही कांहीं वाल्मीकीचें पंपासरोवर नव्हे असें निश्चित विधान त्या. नीं करून ( पृ ४५ ) उगाच प्रतिपक्षावर आक्षेप घेतले आहेत. कारण सिंहलद्वीपाला जे लोक लंका समजतात ते तुंगभद्रेला पंपा समजत नाहींत. पंपा ही तुंगभद्रेशीं आहे अशी त्यांची समजूत आहे म्हणजे पंपासरोवर व तुंगभद्रानदी हीं जवळ असलीं तरी वेगळीं आहेत व यांची जाणीव त्यांना आहे. मात्र येथें प्रसंगप्राप्त म्हणून सांगणें अवश्य आहे कीं याप्रसंगीं रामायणांत तुंगभद्रेचें वर्णन मुळींच केलेलें नाहीं. मात्र येथें नदीचा म्हणून जो उल्लेख कोठें कोठें आढळतो तो तुंगभद्रेचा असावा अशी आमची कल्पना आहे. कबंधानें रामाला सुग्रीवाकडे जाण्याविषयीं जो सल्ला दिला त्यांत पंपेचा पुष्करिणि म्हणजे सरोवर म्हणून उल्लेख आहे (३।७३।१०) ऋश्यमूकाजवळचें म्हणून येथपर्यंत ज्याविषयीं विवेचन केलें तें पंपासरोवर होय. सुग्रीवाचे आज्ञेनें मारुती रामाकडे येऊन भेटला त्यावेळीं त्याचे भाषणांत प्रथम पंपासरोवराचा पंपातीररुहान् वृक्षान् वीक्षमाणौ ४।३।६ ) उल्लेख असून

पुढील श्लोकांत नदीचा ( इमां नदी शुभजलाम् ) आहे. तसेंच वालीचें प्रेत दहनाकरितां नदीतीरीं नेऊन तेथें चिता केल्याचें ( ४।२५।३५ ) व त्याला उदक देण्याकरितां वानरमंडळी नदीवर ( ४।४५।४७ ) आल्याचें वर्णन आहे. तसेंच पावसाळीं राम प्रस्रवणावारील गुहेंत राहिल्यावर त्यांचे भाषणांत नदीचें वर्णन प्राचीन वाहिनी ( ४।२७।१५ ) असें आलें आहे. तुंगभद्रा पूर्व वाहिनी आहे व या वर्णनावरून ती तुंगभद्रा असें आम्ही ठरविलें आहे. एका स्थलीं मात्र पंपानदी (३।६।१७) म्हणून उल्लेख आहे व यावरून रामायणकालीं तुंगभद्रेला पंपेच्या सान्निध्यास्तव पंपानदी म्हणत असावे असें वाटतें. तेथील अरण्यालाहि याप्रमाणें पंपाकानन म्हणत असून ( ४।४।४ ) कोठें पंपोपवन ( ४।१।१०२ ) असा निर्देश आहे.

पंपानदी व पंपासरोवर हीं आतां नदीचें नामांतर होऊन भिन्न आहेत पूर्वी नामांतर नसलें तरी त्यांतील भेद लोकांना विदित होता हें विशेष आहे. रामायण कालची वरील नदी पूर्ववाहिनी असल्याचें वर दाखविलें आहे. राम प्रथम पंपेच्या पश्चिम तीरीं असल्याचें वर्णन आहे ( ३।७४।४३ ). पूर्व वाहिनी नदीचें तीर पश्चिमेला असणें शक्य नाहीं. तसेंच रामाचे भाषणांत पंपेच्या दक्षिणतीरींच्या एका वृक्षाचें ( ४।१७२ ) वर्णन आलें आहे. अशा रीतीनें या पंपेला पश्चिमेचें व दक्षिणेचें तीर असल्यामुळें हें वर्णन नदीचें नसून सरोवराचें होय हें उघड होत आहे. अर्थात् जेथें पंपानदी

असें म्हटलें आहे तेथें ती पंपासरोवराहून भिन्न व स्वतंत्र होय असें समजावयाचें आहे.

तसेंच कबंधाचे भाषणांत पंपेविषयीं " समतीर्थाम् " ( ३।७३।११ ) असें वर्णन आहे. तीर्थ म्हणजे उतरण्यासाठीं बांधलेला घाट. समतीर्था म्हणजे सारखे अर्थात् चारी बाजूंला घाट असलेली पंपा यावरून रामायण कालीं पंपेला चारी बाजूनें उतरण्यासाठीं घाट बांधलेले होते असें दिसतें. तसेंच या वर्णनावरून सरोवर विशाल असलें तरी त्याचा मर्यादितपणाहि सूचित होतो. न्या० चें पंपासरोवर ३५ चौरस मैलांचें आहे. एवढ्या सरोवराला चारी बाजूंनीं घाट बांधणें इष्ट अथवा अवश्य नाहीं आणि शक्यहि नाहीं. सध्यां लोकांमध्यें रामकालीन म्हणून मान्य असलेल्या पंपेला घाट असल्याचें माहीत आहे तथापि त्याचें बांधकाम तेव्हांपासून आतांपर्यंत इतका दीर्घकाळ जशाचें तसें राहिलें आहे असें आम्ही म्हणत नाहीं; मध्यंतरीं त्याचा कोणी जिर्णोद्धार करून तेथें कांहीं फेरफारहि केले असतील; कारण सध्यां पंपातीरीं देवालय धर्मशाळा असून त्या अर्वाचीन काळांतील होत यांत शंका नाहीं. तथापि घाट असल्याचे वर्णनावरून सरोवराचा विस्तार मर्यादित ठरतो व त्यांतून पलीकडे जाण्याला सांकवाची आवश्यकता नाहीं इतकेंच आम्हांला येथें दाखवावयाचें आहे. अर्थात् न्या. नीं शोधून काढलेली दमोहांतील जलाशय रामकालांतील पंपासरोवर नव्हे हें उघड आहे.

## जगन्नाथ मंदिर

न्या. अय्यर यांनीं लंकास्थल निश्चयाचे कामी जीं महत्वाचीं प्रमाणें दिलीं आहेत त्यांपैकीं कटंगीशीं असलेलें जगन्नाथाचें मंदिर हें एक होय. हें मंदिर भारनार डोंगराचे उतरणीवर आहे. याविषयीं सामान्यपणें वाटणारी शंका प्रारंभीचे लेखांकांत आम्ही दिली आहे. आतां त्याविषयीं अधिक विचार करूं. या मंदिराचा उल्लेख रामायणांतील एका कथेंत असल्याचें न्या. नीं सांगितलें आहे. ही कथा उत्तर कांडांत आली आहे. रामाचे सरयूप्रवेशाचे वेळीं रामांनीं बिभीषणाला "आराधय जगन्नाथमिक्ष्वाकुकुल-दैवतम्" (१०८।२८) असा उपदेश केल्याचें या कथेंत सांगितलें आहे. या सर्गांतील श्लोक (१७ ते ३६ पर्यंत) १९ श्लोक प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं पूर्वीं ठरविलें आहे (रा. स. द्वि. खं. पृ. ३६६–६८) रामांनीं लक्ष्मणाचा त्याग केल्यावरून त्यानें प्रायोपवेशन करून देह विसर्जन केल्यावर त्यांनीं स्वतां सरयूप्रवेश करण्याचें ठरवून राज्याची व्यवस्था केली. यावेळीं शत्रुघ्नाला दूत पाठवून आणविल्याचें व कुशलवांना राज्याभिषेक केल्याचें वर्णन आहे. बिभीषण तेथें असण्याचा संभव नाहीं व त्याला बोलावून आणिल्याचें सांगितलेलें नाहीं. शत्रुघ्न व राम यांचें बोलणें संपतें तोंच वानर व राक्षस अचानक तेथें आले असें वर्णन आहे त्यांत बिभीषण असल्याचें गृहीत धरावयाचें आहे; म्हणजे हें वर्णन

वरवर वाचणारालाहि प्रक्षिप्त असल्याचें पटण्यासारखें आहे. जगन्नाथाचा हा निर्देश रामायणांत एवढाच आहे व जगन्नाथाचे कोणा तरी उपासकानें हा प्रक्षेप केला असावा अशी समालोचनेंतील वरील भाग लिहिते वेळीं आमची कल्पना होती; मात्र जगन्नाथ कोणता हें कळण्यास मार्ग नव्हता व नाहीं. न्या. नीं लंकेबरोबर या देवतेचाहि शोध लाविला आहे. त्यांनीं येथें असा तर्क केला आहे कीं येथील जगन्नाथाचें मंदिर आपल्या विजयाचे स्मरणार्थ रामांनीं बांधून त्यांत मूर्तीची स्थापना केली व हें बिभीषणाला केलेल्या उपदेशावरून ध्वनित होतें. मंदिराविषयींची ही कल्पना रामाचे भाषणावरून ध्वनित होत असल्याचें त्यांनीं लिहिल्यावरून त्यांना त्याविषयीं मूळांत आधार मिळत नसल्याचें स्पष्ट होत आहे. जगन्नाथ हें इक्ष्वाकूंचें कुलदैवत असल्याविषयींहि कोठें आधार नाहीं. यौवराज्याभिषेक रामाला व्हावयाचा होता त्याचे पूर्वरात्रीं " विष्णूचे आयतनामध्यें " शयन केल्याचें रामायणांतील वर्णन न्या. नीं येथें प्रमाण म्हणून दिलें आहे. कुलदेवतेविषयीं बोलावयाचें तर तेथें स्पष्ट त्या शब्दांनीं उल्लेख पाहिजे. तेथें पर्याय चालावयाचा नाहीं. विष्णु व जगन्नाथ हे भिन्न नसतील तर शिवविष्णूंतहि भेद मानावयाचा नाहीं हें विसरतां नये. दुसरें असें कीं विजयाचे स्मरणार्थ रामांनीं आपल्या कुलदेवतेचें मंदिर बांधावयाला हें स्थान शोधून काढण्याचें कारण काय? हें मंदिर न्या. च्या लंकेशीं असतें तर शोभलें असतें. हें स्थान कटंगी नामक गांवाशीं

आहे व तें गांव लंकेपासून फार दूर नाहीं अशी येथें न्या. नीं कारणपरंपरा दिली आहे ( पृ. ५२।५३ ). सीताशुध्द्यर्थ वानर विंध्याचे नैर्ऋत्य टोंकाशीं आले व गोंधळले म्हणून जें वर्णन रामायणांत आहे तें ज्या स्थानाशीं जमतें म्हणून न्या. नीं ठरविलें आहे तें स्थान म्हणजे कटंगी जवळचा भाग होय. ( पृ. ५१।५२ ) येथून लंकेकडे थेट जाण्याकरितां मार्ग नसून मध्यें हिराण नदी व पुढें त्यांनीं कल्पिलेला सागर येत आहे. मारुतीला लंकेत जाण्याकरितां परत उत्तरेकडे जावें लागलें व तिकडे गेल्यावर महेंद्रद्वाराचे मार्गें सागरावरून तो लंकेकडे गेला असें न्या. नीं ठरविलें आहे व नंतर रामहि त्याच मार्गें त्यानंतर गेले हें उघड आहे. अर्थात् या बाजूला त्यावेळीं येण्याचें रामाला कारण पडलें नाहीं व पुढें तर ते विमानांतून परभारें अयोध्येकडे गेले. मग या स्थानाची निवड त्यांनीं केली म्हणावी तर त्याचें कारण कोणतें समजावयाचें ? लंकेकडे जातेवेळीं किंवा परत येते वेळीं राम या बाजूला जर आले नाहींत तर ही योजना तरी त्यांनीं केव्हां केली असें म्हणावयाचें ? अयोध्येंत जाऊन राज्याभिषेक झाल्यावर तरी ते दक्षिणेकडे येथें आले म्हणावें तर त्यालाहि रामायणांत आधार नाहीं. मिळून काल स्थळ या दोनहि दृष्टींनीं पाहतां मंदिराची कल्पना अप्रयोजक आहे. विजयानिमित्त स्मारक करण्याची कल्पना प्राचीन काळची नसून आधुनिक आहे हेंहि येथें लक्षांत घेणें अवश्य आहे.

## सिंहलद्वीपाची लंका कशी झाली ?

लोकांचे समजुतीवरील आपल्या आक्षेपांचे समर्थनार्थ न्या. नीं भोजाचे रामायणचंपूचें प्रमाण दिलें आहे. लक्ष्मणसूरीनें लंका व सिंहलद्वीप यांचें अभेदानें निरूपण आपल्या युद्धकांडांत केलें असून भोजाचे कांडपंचकांत सिंहलद्वीपाचें नांव नाहीं यावरून भोजाला हा अभेद संमत नव्हता किंवहुना माहित नव्हता अशी न्या. ची कल्पना दिसते. ( प्रस्त. पृ. १६ ) भोजानें केवळ लंकेचा उल्लेख केला आहे यावरून न्या. नीं हें अनुमान कसें काढिलें हें कळत नाहीं. सीताशुद्धयर्थ सुग्रीवाचे आज्ञेवरून अंगदादि वानर निघाले ते.किष्किंधेहून दक्षिणेकडे गेले असें वर्णन त्यानें किष्किंधाकांडांत केलें आहे. ( श्लोक ३८ ) पुढें संपातीनें सांगितलेल्या मार्गानें ते गेल्यावर त्यांना समुद्र दिसल्याचें (४३) सांगितलें आहे. अर्थात् हा दक्षिणोदधि होय व याचें लंघन करून मारुती पलीकडे गेल्यावर त्याला लंका गांठतां आली. म्हणजे लौकिक समजुतीस अनुसरून सिंहलद्वीपालाच भोज लंका समजत होता असें सिद्ध होत नाहीं काय ? न्या. नीं. स्पष्ट लिहिलें नसलें तरी आपण ठरवीत असलेली लंका भोजाला संमत होती असें त्यांना दाखवावयाचें असून त्यासाठीं त्यांनीं भोजाचे कांडपंचकांतील केवळ लंकेचा उल्लेख पुढें केला आहे. लक्ष्मणसूरीनें केलेलें अभेद वर्णन न्या. नां. संमत नसल्यानें भोजाचें मत त्याहून भिन्न असें भासविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. परंतु भोजाचे वरील वर्ण-

नावरून त्याला सिंहलद्वीप व लंका हीं भिन्न वाटत नव्हती आणि लक्ष्मणसूरीनें केलेलें अभेद वर्णन अपूर्व म्हणून केलें नसून भोजाचें वर्णन त्यानें मान्य करून काव्याचा अवशिष्ट भाग पुढें जोडला आहे असें सिद्ध होतें.

दुसरें असें कीं उज्जयिनी येथें भोज राज्य करीत असून तो चांगला विद्वान होता. कटंगी जवळ जेथें लंका असल्याचें न्या. नीं ठरविलें आहे त्याचे भोंवतीं हिराण वगैरे नद्यांचा वेढा असून महेंद्रद्वारा ( कटस खिड ) पासून त्यांच्या लंकेपर्यंत या नद्यांचा मोठा जलाशय निसर्गत: बनला असावा व वानर तोच समुद्र समजले अशी न्या. ची कल्पना आहे. हा प्रदेश भोजाचे वेळीं त्याचे राजधानीपासून फार दूर होता असें म्हणतां येत नाहीं; तर त्यालाहि वानरांची झालेली भूल लक्षांत येऊं नये व त्यानेंहि आंधळेपणानें वानरांचे मागून त्या जलाशयांतून तो दक्षिणोदधि समजून पलीकडे जावें हें आश्चर्य नव्हे काय ?

## लेखांक ५ वा

# उपेक्षित प्रमाणें

न्या. अय्यर यांच्या प्रस्तुत प्रबंधांतील लंकाविषयक विवेचनाचे स्वभावतः जे दोन भाग पडतात त्यांविषयीं मागील दोन लेखांकांत येथपर्यंत क्रमानें विवेचन केलें; त्यावरून लोकांचे समजुतीवरील न्या. चे आक्षेप निरस्त झाले असून त्यांनीं जी नवी कल्पना पुढें ठेविली आहे तिला रामायणांत कसलाहि आधार मिळत नाहीं हें सिद्ध झालें असल्याचें वाचकांला कळून येईल. आतां त्यांचे प्रबंधांतील विवेचनासंबंधानें सामान्यपणें विवेचन करावयाचें तें करून हें परीक्षण पुरें करूं. कारण त्यांच्या विवेचनाचे जे आम्ही स्वाभाविक दोन भाग आमचे सोयीसाठीं केले त्यांचे धोरणानें येथपर्यंत आम्हीं विवेचन केलें; त्यांनीं रामायणांतील कित्येक प्रमाणें विचारांत घेतलेलीं नाहींत व पूर्वींच्या लेखांकांत आम्हीं सोयीसाठीं पत्करलेल्या मर्यादेमुळें आम्हांला त्या संबंधानें त्यांत कांहीं लिहितां आलें नाहीं व त्याविषयीं चार शब्द लिहिल्या वांचून हा विषय पूर्ण झाला असें म्हणतां येणार नाहीं. यासाठीं प्रस्तुत लेखांक लिहावयास घेतला आहे. न्या. शीं आमचा कितीहि विरोध असला तरी त्यांनीं या कामीं जे परिश्रम केले ते अगाध आहेत यांत शंका नाहीं; आणि इतके परिश्रम व ते सद्धेतूनें केलेले असतां त्यांची

फसगत कां झाली हें पाहणें व वाचकांस तें सांगणें हें आमचें क्रमप्राप्त कर्तव्य आहे असें आम्हीं समजतों.

## विपरीत क्रम

न्या. अय्यर यांचे प्रबंधामध्यें सकृद्दर्शनीं दृष्टोत्पत्तीस येणारा महत्वाचा दोष असेल तर तो विपरीत क्रमाचा होय. लोकांतील प्रचलित समजूत चुकीची असल्याचें त्यांना कसें व कां वाटलें हें सांगावयाचें काम त्यांनीं प्रथम करावयाचें त्याप्रमाणें केलें हें युक्त होय. यानंतर त्यांनीं नवी कल्पना मांडावयाची तर रामचरित्र विषयक निर्विवाद स्थलापासून प्रारंभ करून रामायणांतील वर्णनास अनुसरून क्रमानें लंकेपर्यंत वाचकांना बरोबर घेऊन येणें हा एकच मार्ग त्या कामीं त्यांना युक्त होता. पण लोकांच्या समजुतीवर आक्षेप घेऊन आपली नवी कल्पना वाचकांपुढें ठेवण्याचा जो त्यांनीं उपक्रम केला तो मुळीं एकदम इंद्रण डोंगर हा पूर्वीचा त्रिकूट असें सांगण्याचा. रामायणांतील इतर स्थळांची योजना लंकेच्या धोरणानें यापुढें त्यांनीं मांडली आहे हें खरें; पण त्यांच्या मतें चुकीच्या समजुतीनें कां होईना पण सिंहलद्वीपाला लंका समजणारा वाचक लंकेपर्यंत गेला असतां अथवा रामायणांतील रामाचे प्रवास वर्णनाचे क्रमानें शरभंगाश्रमापर्यंत आला असतां त्याला लंका दाखविण्याच्या हेतूनें अचानक उचलून दमोह जिल्ह्याकडे आणावयाचा तर त्याला कारणें नकोत का सांगा·

वयाला ? तिसऱ्या प्रकरणाचा उपक्रम पाहिला म्हणजे खरोखर वाचक एकदम भांबावून जातो. शरभंगाश्रमापुढें रामायणांत रामाचे प्रवासाचा क्रम सांगितला आहे पण मधील अंतर किती ? व तें चालण्याला काळ किती लागला हें मुळींच सांगितलेलें नाहीं व पुढील प्रवासस्थल क्रमानें ठरविण्याचे कामीं ही अडचण आहे ही गोष्ट खरी आहे; पण ती अडचण लंकेपासून उलट पाठीं आल्यानें टळते असें थोडेंच आहे ! पण त्यांच्या या विपरीत उपक्रमानें काय होत आहे ? तर न्या. अय्यर यांनीं लंकेचें स्थान आधींच मनाशीं निश्चित ठरविलें असून त्याचें कसें तरी समर्थन ते आतां करणार आहेत असा वाचकांचा एकदम ग्रह होतो व पुढील विवेचनावरून तर तो दृढच होतो. लंकेजवळचा सागर, सुवेलाचल, त्रिकूट, महेंद्रद्वार, पंपा, ऋश्यमूक वगैरे स्थलांविषयीं त्यांनीं यापुढें जें प्रतिपादन केलें आहे त्यांत कोणतेंहि पृष्ठ उघडा मुळाशीं कशी तरी संगति लावण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला आहे असें दिसून येईल. रामायणकाळची अयोध्या, सरयू, चित्रकूट हीं स्थानें सध्यां त्याच नांवानें प्रसिद्ध आहेत; मग वरील पैकीं एकहि स्थान त्या नांवानें-अपभ्रष्ट रूपानें देखील-राहूं नये याचें कारण काय ? या स्थानांचीं सध्यांचीं नांवें न्या. नीं त्या त्या प्रसंगीं सांगितलीं आहेत पण त्यांपैकीं एकाचाहि प्राचीन नांवाशीं इतकेंच नव्हे तर रामचरित्राशीं संबंध दिसत नाहीं. बरें, या उलट क्रमानें कां होईना पण त्यांनीं रामाचे प्रवासांतील सर्व स्थानांचें शेवटपर्यंत विवेचन

केलें असें म्हणावें तर तेंहि केलेलें नाहीं. बराबरी ते पंपेच्या मार्गें मतंगवनापर्यंत आले आहेत. पण चित्रकूट या निर्विवाद स्थलापासून राम लंकेपर्यंत कोणत्या मार्गें आले, रावणानें सीतेचा अपहार कोठें केला म्हणजे त्यांचें निवासस्थान-पंचवटी—कोठें आहे याविषयीं त्यांनीं कांहीं विवेचन केलेलें नाहीं. प्रवासाचा विपरीत क्रम घेण्याचें कारण प्रस्तावनेंत लिहिल्याचें त्यांनीं परिशिष्टाचे प्रारंभीं ( पृ. १०५ ) सांगितलें आहे पण अयोध्येपासून मतंग वनापर्यंतचे रामाचे प्रवासांतील स्थलांविषयीं स्वतंत्र प्रबंध प्रसिद्ध करण्याचा विचार असल्याचें त्यांनीं लिहिलें आहे या वांचून दुसरें कोणतेंहि संयुक्तिक कारण त्यांच्या प्रस्तावनेंत दिसून येत नाहीं. नाहीं म्हणावयास न्या. नीं प्रयागा संबंधानें थोडें विवेचन ( पृ. १०० वरील टीपेंत ) करून मतभेद दर्शविला आहे तर पंचवटी संबंधानें प्रस्तावनेचे प्रारंभीं* त्यांनीं आपलें निश्चित मत विवेचन न करितां सांगून टाकिलें आहे.

---

*टीप—रामाचे वेळीं प्रयाग नव्हता असा शोध येथें न्या. नीं दिला आहे. सध्यां ज्याला आपण अलाहाबाद म्हणतों तेथें पूर्वींचा प्रयाग होता अशी लोकांमध्यें समजूत आहे. न्या. ची कल्पना अशी आहे कीं त्या स्थानीं पूर्वीं सागर म्हणून मोठें सरोवर होतें व गंगा यमुना त्याला मिळत असत. खिस्तपूर्व संस्कृत वाङ्मयांत प्रयागचा उल्लेख मिळत नाहीं असें याचें कारण त्यांनीं येथें दिलें आहे. परंतु रामा-

टीप पुढें चालू

पण यामुळें पंचवटीसंबंधानें त्यांचें मत वाचकांला कसें पटावें ? आणि तें पटल्यावांचून पुढें लंकेपर्यंत त्यानें प्रवास कसा करावा ? त्यांच्या या लोकविलक्षण प्रथेवरून आम्हांला अशाच एका प्रयत्नाची आठवण झाली. हिंदी भाषेंत कीर्तनें करूं लागून महाराष्ट्रांतील कीर्तनपद्धतीचा प्रचार उत्तरेकडे करणारे प्रसिद्ध हरिदास कै. विष्णुबुवा लळीत सहज बोलतांना म्हणाले होते कीं एक इंग्रजी कविता घेऊन ती संस्कृत मानावयाची व तिचा सुसंबद्ध अर्थ लावावयाचा असा प्रयत्न आपण करणार आहों; कारण संस्कृत भाषेंत धातु व प्रत्यय विपुल असून नवीन शब्दसृष्टि करण्याची विलक्षण सोय

---

टीप मागील पानावरून चालू

यणांत प्रयागाचा उल्लेख दोन स्थलीं आहे (२।५४।५ व ३४) यांतील प्रथमचा रामाचे भाषणांत ( प्रयागमभितः पश्य ) व दुसरा कवीचे वर्णनांत आला आहे. न्या. चे कल्पनेला रामाचे भाषणांतील "यत्रैव यमुना पूर्णा समुद्रमुदकाकुलम्" ( २।१०५।१९ ) हें विधान कारण झालें आहे. यांत यमुना समुद्राला मिळत असल्याचें सांगितलें आहे पण तेथें "पूर्णा" शब्द योजून कवीनें तेथील संभवनीय शंकेचें निरसन आधींच केलें आहे. गंगेला मिळाल्यावर तिला पूर्णता येते व अशा रीतीनें पूर्ण झालेली ती समुद्राला मिळते असा त्याचा अर्थ होय. नाहीं तर पूर्णा शब्द तेथें योजण्याचें कारण काय ? महाभारतांतील असेंच एक वचन येथें त्यांनीं प्रमाण म्हणून दिलें आहे; त्यांत बृहद्रथ राजाचें वर्णन आहे. त्याला दोन स्त्रिया होत्या व त्यांमध्यें तो गंगायमुनेच्या मध्यभागीं सा़ग

आहे. त्यांनीं हा प्रयत्न पुढें खरोखर केला अगर कसें हें मागाहून कळलें नाहीं; पण न्या. नीं मात्र प्रस्तुतचा प्रबंध म्हणजे तसा प्रयत्न केला आहे असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं.

---

टीप मागील पानावरून चालू

शोभावा त्याप्रमाणें शोभत असे अशी उपमा दिलेली आहे (सभा. १७।१८-२० गंगायमुनयोंमध्ये मूर्तिमानिव सागरः) उपमा देतांना कवीनें येथें समुद्राची मूर्ति कल्पिली आहे; अर्थात् वस्तुस्थितीचें हें वर्णन नव्हे असें स्वतः कवि जेथें सांगतो तेथें त्यावरून वस्तुस्थितीविषयीं भिन्न अनुमान कसें करितां येईल? समुद्राची मूर्ति कल्पावयाची तर त्याकरितां गंगा यमुनांच्याहि मूर्ति कल्पनेनें बनवाव्या लागतील असें येथें कवीनें सूचित केलें आहे असें येथें आणखी सुचवून ठेवितों. त्यांचा हा सारा खटाटोप पंपेविषयींच्या आपल्या कल्पनेला पोषक म्हणून त्यांनीं केलेला आहे व तसें त्यांनीं येथें स्पष्ट लिहिलें आहे. गंगा व यमुना यांचा येथें संगम नसून त्या दोनहि सागर नामक सरोवरास मिळतात अशी त्यांची कल्पना आहे पण त्यांचा संगम येथें असल्याचा रामाचे भाषणांत स्पष्ट उल्लेख आहे ( नूनं प्राप्ताः स्म संभेदं गंगायमुनयोर्वयम् २।५४।६ ) भरद्वाजाचा आश्रम या संगमावर ( गंगायमुनयोः संधौ २।५४।८ ) असल्याचें यापुढें सांगितलें आहे. म्हणजे हा संगमाचा दुसरा उल्लेख होय. अशा प्रकारें दोनहि स्थानांविषयींच्या न्या. च्या कल्पना निराधार आहेत.

## गोदावरी नदी

न्या. अय्यर यांनीं नर्मदेच्या उत्तरभागीं लंका ठरविण्याला जीं कारणें दिलीं आहेत त्यांत रामाचे प्रवासांत त्याला नर्मदा लागल्याचा उल्लेख नाहीं हें एक महत्त्वाचें प्रमाण होय; याविषयीं आमचें म्हणणें आम्ही पूर्वीं सांगितलेलें आहे. नर्मदेचा उल्लेख नाहीं या गोष्टीला त्यांनीं जें महत्त्व दिलें आहे त्याहून अधिक महत्त्व ज्याविषयीं उल्लेख आहे त्या बाबीला द्यावयास नको काय? व हें लक्षांत येण्यासाठीं नर्मदेच्या अनुल्लेखाविषयीं त्यांनीं माजविलेल्या अवडंबराची येथें आठवण द्यावी लागली आहे. महानदी या नात्यानें नर्मदेहून गोदावरीला कोणत्याहि प्रकारें कमी महत्त्व नाहीं व गोदावरीचा उल्लेख रामायणांत किती तरी वेळां आलेला आहे. न्या. नीं हें प्रमाण विचारांत न घेतां आपला प्रबंध लिहिला आहे. जनस्थान व पंचवटी येथपर्यंतचा रामाचा प्रवास, तेथील निवास; सीतेचा अपहार; रामांनीं त्यानंतर केलेला सीतेचा शोध या निमित्त गोदावरीचा उल्लेख पुष्कळ वेळां आलेला आहे. त्याकरितां येथें स्थलनिर्देश करण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. अवश्य तर त्यांनीं अरण्यकांड अवलोकन करावें इतकें येथें सुचवून ठेवितों.

## पंचवटी ते पंपा.

न्या. अय्यर यांनीं पंचवटीचें स्थान सध्यांचें हिंदोरिया या गांवाशीं ठरविलें आहे. हें गांव दमोह जिल्ह्यांत दमोहापासून

दहा मैलांवर आहे. शरभंगाश्रमापासून राम सुतीक्ष्णाश्रमीं आले व तेथून अगस्त्याचे बंधु व मग अगस्त्य यांचे आश्रमीं येऊन अगस्त्याचे सांगण्याप्रमाणें पंचवटींत येऊन राहिले. शरभंग ते सुतीक्ष्ण यांचे आश्रम यांचे मधील अंतर व तें चालण्यास लागलेला काल या विषयीं रामायणांत कांहीं आधार मिळत नाहीं. न्या. नीं हें अंतर ९४ मैल धरिलें आहे. सुतीक्ष्णाश्रमापासून पंचवटी सात योजनांवर असल्याचें रामायणावरून स्पष्ट दिसतें. सध्यां नाशिक जवळ पंचवटी असल्याविषयीं लोकांत समजूत आहे. शूर्पणखेचा नासिकाछेद येथें लक्ष्मणानें केल्यावरून गांवाला नासिका म्हणूं लागले व नाशिक हा त्याचा अपभ्रंश होय असें म्हणतात. तें कसेंहि असो; पंचवटी गोदावरीशीं आहे असें रामायण सांगतें व सध्यां ती तेथें वाहात आहे. तथापि न्या. नीं ठरविलेली पंचवटी हीच रामायणकालची पंचवटी समजून पुढील प्रवासाकडे वळूं.

पंचवटीपासून पंपेपर्यंत मधील अंतर ३४ मैल असल्याची न्या.ची कल्पना आहे (पृ. १०८). हें अंतर रामायणाशीं कसें मिळतें हें त्यांनीं सांगितलें नाहीं; तेव्हां तें आतां पाहूं. कारण निर्णयाचे कामीं रामायण हेंच अंतिम प्रमाण आहे. पंचवटींत असतां सीतेचा अपहार रावणानें केल्यावर राम तेथून सीतेचा शोध करीत दक्षिणेला निघाले असें सांगून रामायणांत मतंगवनापर्यंत त्यांचे प्रवासाचा क्रम व्यवस्थित दिला आहे. पंचवटी जनस्थानांत होती व जनस्थानापासून तीन कोसांवर क्रौंचारण्य व तेथून तीन कोसांवर मतंगाश्रम. मधील क्रौंचारण्य

केवढें हें येथें सांगितलेलें नाहीं. तथापि मधील अंतर विशेष नसावें. तेथून जवळच त्यांची कबंधाशीं गांठ पडली व त्यानें सुग्रीवाशीं सख्य करण्याची रामाला सल्ला देऊन त्याचा पत्ता सांगितला. पश्चिमेच्या बाजूला फुललेल्या वृक्षांची झाडी आहे. त्या बाजूनें गेल्यावर एक अरण्य व त्यापुढें दुसरें उत्तरकुरू-प्रमाणें समृद्ध असलेलें एक अरण्य लागेल असें सांगून पुढील मार्गाचें वर्णन त्यानें संक्षेपतः पुढील श्लोकांत केलें आहे.

चंक्रमन्तौ वरान् देशाञ्छैलाच्छैलं वनाद्वनम् ।
ततः पुष्करिणीं वीरौ पंपां नाम गमिष्यथः ॥ ३।७३।१०

येथें मधील अंतर न सांगतां अनेक देश आक्रमण करावे लागतील व या पर्वतावरून त्या पर्वतावर आणि या अरण्यां-तून त्या अरण्यांत अशा प्रकारें मार्ग काढीत जावें लागेल अशी स्पष्ट सूचना कबंधानें रामाला दिली आहे. म्हणजे अनेक देशांप्रमाणें अनेक पर्वत व अरण्यें वाटेंत होतीं असें यावरून स्पष्ट दिसतें. यांतील "चंक्रमन्तौ" हा शब्द महत्वाचा आहे. क्रम धातूवरून यङ् लुक् प्रत्यय होऊन झालेलें हें रूप आहे. हा प्रत्यय पौनःपुन्य व वैपुल्य या अर्थी धातूवरून होत असला तरी गत्यर्थ धातूवरून तो कौटिल्यार्थी होतो. क्रम धातु गतिवाचक म्हणून येथें कुटिल गति विवक्षित आहे. कुंभकोण प्रतींत यावर "पुनः पुनर्गच्छन्तौ" अशी टीप दिलेली आहे ती चुकीची आहे. म्हणजे हा प्रयोग करून कबंधानें रामाला एवढें सुचविलें आहे कीं मधील मार्ग सरळ नसून त्यांत चढउतार फार

आहेत व वळणें आहेत व म्हणून वांकडें तिकडें जावें लागणार आहे. सीतेला रथांत बसवून रावण ज्या मार्गानें गेला असें न्यायमूर्ति म्हणतात तो हा मार्ग नव्हे! न्या. नीं ठरविलेल्या मधील ३४ मैलांच्या प्रदेशांत कितीसे देश, पर्वत व अरण्यें यांचा समावेश करितां येईल हें आतां वाचकांनी पहावें !

## प्रवासाचा काल

पंचवटी पासून पंपेपर्यंतचें अंतर रामायणांत सांगितलें नसलें तरी तें तोडण्यास रामाला किती काल लागला यावरून त्याविषयीं कांहीं कल्पना करितां येईल. हा काल रामायणांत स्पष्ट सांगितलेला आहे असें नाहीं; तर तो अनुमानानें ठरवावयाचा आहे. अरण्यकांडाचे १६ व्या सर्गांत हेमंताचें वर्णन आलें असून तेथील वर्णनावरून त्या दिवशीं पौष शु॥ १५ तिथि असावी असें दिसतें ( १६।१२ व १४ ) त्या दिवशीं पौर्वाह्णिक आटोपून राम पर्णकुटींत बसले असतां तेथें शूर्पणखा आली अशी कथा आहे. यानंतर क्रमानें घडामोडी होत सीतेचा अपहार रावणानें केला आहे. सीतापहरणाचा निश्चित दिवस सांगितलेला नाहीं तथापि मधील घडामोडी होण्याला एक मासापेक्षां अधिक काळ लागूं नये असा तर्क होतो. हेमंताचे वर्णनाचा उपक्रम " शरद्व्यपाये हेमंत ऋतुरिष्टः प्रवर्तते " ( १६।१ ) असा केला आहे. म्हणून शरद्दतूची समाप्ति व हेमंताचा प्रारंभ येथें व्यक्त होतो.

चांद्रमासाची समाप्ति निश्चित तिथीनें होते तसें ऋतूंचे बाबतींत म्हणतां येत नाही. हिंवाळ्यानंतर क्रमानें उन्हाळा येतो पण एकाची समाप्ति व दुसऱ्याचा प्रारंभ विशिष्ट दिवशीं होतो असें नाहीं. हिंवाळ्याची समाप्ति होत जाते व त्याबरोबर उन्हाळ्याचा प्रवेश होत असतो. तेव्हां वरील स्थलीं शरदृतूच्या समाप्तीचा निर्देश केला आहे यावरून त्यावेळीं शरदृतु संपत येऊन हेमंत डोकावूं लागला होता असें कवीला विवक्षित असल्याचें दिसतें. सीतेचा अपहार त्यानंतरचा म्हणजे एकंदरींत तो हेमंताचे प्रथम मासीं झाला असें निश्चित म्हणतां येईल. यानंतर सीताशुद्ध्यर्थ रामाचे प्रवासाला प्रारंभ झाला. कबंधोपदिष्ट मार्गानें राम पंपातीरीं पोंचले त्यावेळीं तेथें गेल्याबरोबर त्यांनीं तेथील वसंताच्या सौंदर्याचें वर्णन केलें आहे. किष्किंधा कांडाचा प्रारंभ या वर्णनानें झालेला असून प्रथम सर्गांचे बहुतेक सर्व-सुमारें १२५-श्लोक या वर्णनाचे आहेत. वसंताचा निर्देश स्पष्ट शब्दांनीं या सर्गांत अनेकवेळां आलेला असून शिशिराचे समाप्तीचा उल्लेख ( १।४३ ) एका स्थलीं आहे त्यावरून वसंताचे प्रारंभींचें हें वर्णन असल्याचें उघड होतें. म्हणजे हेमंताचा अर्ध अर्थात् एक मास व शिशिराचे दोन मिळून तीन मास इतका काळ रामाला पंचवटीहून पंपेपर्यंत येण्यास लागला हें उघड आहे. हेमंताचे प्रारंभीं सीतेचा अपहार झाल्याचें वास्तविक दिसत आहे व पंपातीरीं वसंत लागल्यावर राम आल्याचें म्हणतां येत आहे व अशा प्रकारें कालगणना केली तर हा काळ चार

मासांचाहि होऊं शकेल; पण तीन मासांहून तो कमी करितां येणार नाहीं हें निश्चित होय. तेव्हां न्या. नीं पंचवटी ते पंपेपर्यंत अंतर ३४ मैल धरिलें आहे एवढा प्रवास करण्यास अगदीं सावकाश चालूनहि इतका काल लागणें शक्य नाहीं. मधील अंतर अधिक असणें भाग आहे व तें तीन महिन्यांच्या प्रवासाचें धरावयाचें म्हणजे पंचवटी व पंपा दोनहि स्थलांविषयींचीं न्या. चीं अनुमानें चुकीचीं ठरतात.

## पंपेपासून सागरा पर्यंत.

पंपेपर्यंतचे रामाचे प्रवासाचा न्या. नीं कसा गोंधळ केला आहे तें येथपर्यंत दाखविलें. आतां त्यापुढें रामाचा प्रवास वानरसेनेसह झाला तिकडे वळूं. पंपेला लागून मतंगवन रामायणांत सांगितलें आहे व तेथून लंकेपर्यंतचें अंतर न्या. नीं २७ मैल धरिलें आहे (पृ. १०९) यांपैकीं महेंद्रापासून लंकेपर्यंत सागर असून तो १२ मैल असल्याचें न्या. सांगतात. म्हणजे पंपेहून निघून राम समुद्रतीरीं येऊन त्यांनीं तेथें मुक्काम केला. अर्थात् पंपेपासून समुद्राचे वेलेपर्यंतचा प्रवास १५ मैलांचा ठरतो. न्या. च्या पंपेपासून महेंद्रद्वारापर्यंत जावयाचें म्हणजे थेट पूर्वेला जावें लागेल; कारण तें थेट पंपेच्या पूर्वेला आहे; आणि रामायणांत तर राम पंपेहून सुटले ते वानरसेनेसह थेट दक्षिणेकडे गेले असें वर्णन आहे (जगाम रामो धर्मात्मा ससैन्यो दक्षिणां दिशम् ६।४।२५ ) दक्षिण

दिशेचा उल्लेख आणखी एकदा आला आहे (६।४।२७) वाटेंत त्यांना सह्यपर्वत लागला (६।४।३८). अनेक सरोवरें, अरण्यें लागलीं (६।४।३८). सह्याद्रि व हीं सरोवरें व अरण्यें पंधरा मैलांमध्यें कशीं बसवावयाचीं हें न्या. च जाणोत ! आतां पुढील श्लोक पहा:—

रामस्य शासनं ज्ञात्वा भीमकोपस्य भीतवत् ।
वर्जयन्नगराभ्याशांस्तथा जनपदानपि ॥६।४।३९॥
सागरौघनिभं घोरं तद्वानरबलं महत् ।
निःससर्प महाघोषं भीमघोष इवार्णवः ॥६।४।४०॥

जातांना मार्गांत अनेक नगरें व जनपद लागले; तेव्हां त्याचे चवळून जाऊं नये अशी वानरांला रामाची आज्ञा होती व त्याप्रमाणें असे प्रदेश चुकवून ती वानरसेना चालत असल्याचें या श्लोकांत सांगितलें आहे. न्या. नीं दिलेल्या नकाशावर पाहिलें तर वरील पंधरा मैल अंतरापैकीं—पंपेपासून किष्किंधा सुमारें पांच मैलांवर आहे व वानरसेना तेथून निघाली असल्यामुळें हे पांच मैल कमी केल्यावर वानरांचा सागरापर्यंतचा प्रवास दहा मैलाचा राहील. यामधील भागांत नकाशा पाहतां दोन तीन नद्या दिसत असून डोंगराची वगैरे मुळींच अडचण नाहीं. दक्षिणेकडे रस्त्यालगत राखींव जंगल आहे व उत्तरेकडेहि जंगल आहे पण दूर आहे. म्हणजे जनपद व नगरें या दहा मैलांचे प्रदेशांत कल्पावयाचीं आहेत. वानरसेनेला मुळांत सागराची उपमा दिलेली आहे. न्या. नीं पुढील सागर बारा मैलांचा ठरविला आहे व वानरसेना प्रचंड होती

हें लक्षांत घेतलें म्हणजे ती चालूं लागली असतां दहा बारा मैलांचा प्रदेश तिनें व्यापिला जाणें साहजिकच दिसतें. अर्थात् हा प्रदेश तिनें केवळ उभें राहून भरून टाकिल्यावर प्रवासाचे श्रम तरी तिला घेऊन काय करावयाचें ?

पंपेपासून सागरापर्यंतचे प्रवासांत अनेक पर्वत व अरण्यें असल्याचें ज्याप्रमाणें येथें सांगितलें आहे त्याप्रमाणें रावण सीतेला घेऊन लंकेला गेला त्याचे प्रवासवर्णनांतहि सांगितलें आहे. सीतेनें ऋश्यमूकावर वानरांकडे अलंकार टाकिल्यावर रावण पंपेवरून थेट लंकेला गेला; येथें "वनानि सरितः शैलान् सरांसि च" (३।५४।७) ओलांडून गेल्याचें वर्णन आहे व वरील वर्णनाशीं तें सुसंगत आहे हें येथें सुचवून ठेवितों.

## अयोध्ये पासून लंका फार दूर असली पाहिजे.

रामाला राज्याभिषेक व्हावयाचा ठरला त्यावेळीं वसंतऋतु असल्याचें रामायणांत स्पष्ट म्हटलें आहे व बरोबर चौदा वर्षें पुरीं झालीं त्या दिवशीं राम परत आल्याचें सांगितलें आहे. राम वनांत गेल्यावर भरत त्यांना परत आणण्यास गेला असतां राम परत आले नाहींत तेव्हां भरत तेथेंच राहिला व रामाला पुढें वनांत जाण्यास निरोप देते वेळीं बरोबर चौदा वर्षें भरतील त्या दिवशीं परत येऊन भेट न होईल तर अग्निप्रवेश करण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. (२।११२।२५) अशी कथा आहे. तेव्हां रामाचे वनवासाचा प्रारंभ व

समाप्ति चौदा वर्षांचे अंतरानें एका ऋतूंत व एका दिवशीं झाली हें उघड आहे.

सीताशुद्ध्यर्थ किष्किंधेहून सुग्रीवाची आज्ञा घेऊन अंगदादि वानर दक्षिणेकडे गेले ते शरदृतु लागल्यावर बाहेर पडले. पावसाळा संपून शरदृतु लागला व सुग्रीव विलास भोगीत राहिल्याचें पाहून रामांनीं त्याला आपल्या प्रतिज्ञेची आठवण देण्यासाठीं त्याजकडे लक्ष्मणाला पाठविलें त्यावेळीं सुग्रीवाचे मंत्रिमंडळांत चर्चा सुरू झाली तीमध्यें मारुतीचे तोंडीं शरदारंभ झाल्याचा उल्लेख आहे (४।३२।१३). सिताशुद्ध्यर्थ जाण्याऱ्या वानरांला सुग्रीवानें एक मासाची मुदत दिली होती. अंगदादि वानर दक्षिणेकडे प्रवास करीत असतां एका ऋक्षबिलांत शिरून भांबावले व एका तापसीचे कृपेनें बाहेर आल्यावर त्यांना वसंतारंभ झाल्याचें ( ते वसंतमनुप्राप्तं ४।५३।२० ) कळून आलें व ते घाबरून गेले असें वर्णन आहे. येथेंच त्यांची संपातीशीं भेट झाली व त्याचे उपदेशाप्रमाणें मारुतीला समुद्रोल्लंघन केल्यावर सीतेचा शोध लागला. यावेळीं सीता व रावण यांमधील संवाद त्यानें ऐकला. रावणानें सीतेला लंकेत आणिल्यावर स्वतःला वश होण्यासाठीं एक वर्षाची मुदत दिली होती; या मुदतीची आठवण या संवादांत रावणानें देऊन त्यांपैकीं दोन महिने उरले असल्याचें सांगितलें आहे. एक वर्षाची मुदत रावणानें कधीं दिली हें कळण्यास मार्ग नाहीं; कारण त्याचा कालनिर्देश रामायणांत नाहीं. तथापि सीतेचा अपहार रावणानें

हेमंतांत केला व लंकेंत गेल्यावर त्यानें लागलीच ही भाषा केली असें म्हणतां येत नाहीं. तेथें गेल्यावर त्यानें तिला बंदींत ठेवून तिचे रक्षणाची व्यवस्था केली इतकें सांगितलें आहे (३।५४). यानंतर कधीं तरी ती भाषा झाली असावी असें वाटतें. मध्यंतरीं किती काल गेला हें सांगितलेलें नाहीं. संपाती व वानर यांची भेट झाली त्यावेळीं वसंतारंभ झाला होता हें वर सांगितलें आहे. त्या नंतर लागलीच मारुती तेथें गेला तेव्हां दोन महिने उरले असल्याची रावणाची वरील भाषा वसंतांत झाली हें उघड आहे यानंतर मारुती परत येऊन राम वानरसेनेसह लंकेला गेले व रावणवध केल्यावर विमानांतून अयोध्येकडे परत आले.

या घडामोडीला काल किती लागला हें पहावयाचें आहे. यांतील सेतुबंधाचा काल पांच दिवसांचा रामायणांत स्पष्ट सांगितला आहे (६।२२।६६–७१) यानंतर ही सर्व सेना सेतुवरून पलीकडे गेली व समुद्रतीरीं उतरली. त्या दिवशीं सूर्यास्ताचे वेळीं रामलक्ष्मण सुवेलाचलीं चढून त्यांनीं तेथून लंका अवलोकन केली. या वेळीं सूर्य अस्तास गेला व तिकडे पूर्ण चंद्राचा उदय झाला असें वर्णन आहे (६।३८।२०) म्हणजे हा दिवस पौर्णिमेचा दिसतो; त्या रात्रीं रामांनीं तेथें वस्ती केली व चंद्रप्रकाशांत त्यांनां लंकेचें निरीक्षण साकल्यानें करितां आलें. या नंतर युद्धाला प्रारंभ झाला. रावण युद्धार्थ बाहेर पडला त्यादिवशीं व॥ ३० होती (६।९३।६२). याच युद्धांत रावणाचा वध झाला. येथें मासाचा निर्देश कोठेंच

नाहीं. तथापि वरील वर्णनावरून युद्धाचा अवधि पंधरा दिवसांचा दिसतो. रामाचे प्रत्यागमनाची तिथि पंचमी सांगितली आहे ( ६।१२७।१ ) त्या दिवशीं राम व भरत यांची भेट झाली. अर्थात् रावणवधानंतरच्या लंकेंतील घडामोडी व विमानांतून रामाचा प्रवास यांचा काल चार दिवसांचा दिसतो. सेतुबंधाचे दिवस पांच धरितां राम दक्षिणोदधीचे तीरीं आल्यापासून प्रत्यागमनापर्यंतचा काल पंचवीस दिवसांचा होत आहे. मारुतीचे तोंडून रावणानें सीतेला दिलेली धमकी कळल्यावर राम किष्किंधेहून निघाले ते त्वरेने हें सांगावयास नको. हा प्रवास रामलक्ष्मणांनीं पायीं केला नसून त्यांना वानरांनीं वाहून नेल्याचें वर्णन आहे ( ६।४।१९-२० ) यांत त्यांची त्वरा व तदनुरूप केलेली व्यवस्था दोनहि दिसून येत आहे. म्हणजे रावणवध वसंतसमाप्तीचे सुमारास पण त्यापूर्वी झाला असावा असें निश्चित दिसून येतें.

यांत विशेष विचार करण्यासारखी गोष्ट म्हणजे लंकेंतील वसंतसमाप्ति व अयोध्येंतील वसंतारंभ हीं एककालीं घडून आलीं ही होय. अयोध्येंत वसंतारंभ होऊन किती दिवस झाले होते हें कळत नाहीं. तथापि तो घडून आल्यापलीकडे विशेष काल गेल्याचें आम्हीं मानीत नाहीं; त्याच दिवसाचे सुमारें वसंत लागला असें आम्हीं धरून चालतों; आणि लंकेंत वसंत समाप्ति होण्याला कांहीं अवकाश असल्याचें मानिलें तर चालेल असेंहि मानितों. म्हणजे ऋतूचे गमनाला एक मासाचा अवधि स्थूलमानानें धरितां येईल. यापेक्षां कमी अवधि मात्र धरितां येणार

नाहीं. म्हणजे ऋतूचा आरंभ लंकेंत झाल्यावर तो ऋतु अयोध्येपर्यंत क्रमानें येण्याला एक मासाचा अवधि अवश्य असल्यानें त्या मानानें मधील अंतर समजावयाचें आहे. वसंत अथवा शरद् यांचे आरंभ अमुक दिवशी निश्चित झाले असें निश्चित कळण्याचें नैसर्गिक साधन नाहीं. रामायणांतील वसंत-विषयक व्यवहार निसर्गावरून घडल्याचें सांगितलें आहे. तेव्हां येथें गणितागत वसंतारंभ घ्यावयाचा नाहीं व यासाठीं त्यांत थोडें अंतर क्षम्य आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. वर्षर्तूचा आरंभ मात्र निश्चित सर्वांला कळून येतो. सीलोनमध्यें पावसाला प्रारंभ झाल्यापासून अयोध्येंत पाऊस पडूं लागेपर्यंत एक मासाचा अवधि लागतो याचा अनुभव प्रस्तुत सर्वांला आहे व त्यास वरील रामायण कालचें वसंतविषयक वर्णन जुळतें आहे. लंकेचें स्थान दमोह जिल्ह्यांत मानिल्यास ऋतूचे गमनाला एक मास इतका काल लागणें शक्य नाहीं. तेव्हां अयोध्या व लंका यांमध्यें अंतर पुष्कळ असलें पाहिजे हें उघड आहे.

वसंतारंभाचे रामायणांतील उल्लेखानंतर मारुती लंकेंत जाऊन परत आला व त्यानंतर राम किंष्किधेहून निघाले येथपर्यंतचा काल निश्चित करण्याचें साधन रामायणांत नाहीं व पुढील घडामोडीला स्थूलमानानें एक मासाहून अधिक काल आवश्यक असल्यानें वसंताचे दोन मासांचे अवधींत सर्व घडामोडी होऊं शकणार नाहींत अशी येथें शंका येते व ती सयुक्तिक आहे. वसंतारंभानंतर एक मासाहून अधिक इतका

काळ लंकेशीं मिळत असल्यानें रावणवधकालीं वसंतसमाप्ति स्थूलमानानें मानणें अपरिहार्य आहे. वसंतारंभाचा जो उल्लेख आहे तेथें फार तर वसंत समीप येण्याचा काळ म्हणजे शिशिरसमाप्तीचा काळ मानल्यास चालण्यासारखें आहे. मूळांत वसंत "अनुप्राप्त" झाल्याचा उल्लेख आहे. कित्येक वृक्षाला फुलें आल्याचें पाहून वानरांनीं वसंतारंभाविषयीं अनुमान केल्याचें तेथें सांगितलें आहे. येथील "अनु" या उपसर्गानें सामीप्य सूचित होत असून तें उभयविध आहे* म्हणजे वसंताला आरंभ झाल्याचें अथवा तो लवकर होणार असल्याचें त्यानें सूचित होत आहे. अर्थात् शिशिरांतींचें तें वर्णन मानिल्यास वरील शंकेला अवसर राहणार नाहीं.

दीपवंसोप्रमाणें महावंसोमध्यें या द्वीपाचें प्राचीन नांव लंका असून त्याला पुढें सिंहलद्वीप म्हणूं लागल्याचें सांगितलें

---

* टीप. "अनु" या उपसर्गाचा असा प्रयोग अनुस्मृतींत पुढील श्लोकांत आहे.

"मरणे समनुप्राप्ते यदेकं मामनुस्मरेत् ।
अदि पापसमाचारः स याति परमां गतिम् ॥

येथें अंतकालीं परमेश्वरस्मरणाचें माहात्म्य सांगितलें आहे. येथें मरणानंतर असा अर्थ घेतला तर त्यानंतर स्मरण शक्य नाहीं. अर्थात् मृत्यु समीर आला असतां त्यापूर्वीं असा अर्थ घ्यावा लागतो व तसा अर्थ वरील स्थलीं घेण्याची कल्पना आम्हीं सुचविली आहे; किंबहुना हाच अर्थ तेथें योग्य

आहे. " विजय राजाचे बापाला त्यानें सिंह मारिल्यानिमित्त सिंहल म्हणत असत व त्यावरून त्याचे पुत्र व पुढें वंशजाला तेंच नांव पडलें. या द्वीपाचें पूर्वीचें नांव लंका होतें; पण एका सिंहलानें जिंकून घेतलें व तेथें सिंहल लोकांनीं वसाहत केली या साठीं त्यालाहि सिंहल हें नांव प्राप्त झालें " (महावंसो परि. १) पाली मध्यें हा शब्द " सिहो " असा आहे.

सीलोनमधील मूळचे म्हणून प्रसिद्ध असलेले जे "वेड्डा" लोक त्यांमध्यें या द्वीपाचें प्राचीन नांव लंका असल्याची अजूनहि समजूत आहे ( Ancient Ceylon पृ. २९ वरील टीप ). मात्र सिंहली लोकांची जेथें वस्ती आहे त्या भागाला ते सिंहल द्वीप म्हणतात. सिंहली लोकहि या द्वीपाचें प्राचीन नांव लंका असेंच मानितात. त्यांमध्यें लंका अथवा लंकाय असें नांव रूढ आहे. ( किता. पृ. २४२ वरील टीप)

सीलोनचे चारी दिशांला चार संरक्षक देवता असल्याची लौकिक समजूत आहे. त्यापैकीं पूर्वेला समन दिव्यराज ही एक आहे. समन हा लक्ष्मण याचा अपभ्रंश होय. तसेंच पश्चिमेकडील देवता विष्णूचा प्रतिनिधि म्हणून बिभीषण मानिला जातो. या दोनहि देवतांचा रामायणाशीं संबंध आहे हें सांगावयास नको. सीलोनचे पश्चिमेकडील भागांत बिभीषणाची पूजा विशेष प्रचलित आहे. लक्ष्मणाचें "समण" असें रूप झालेलें आम्हांला माहीत आहे. तेथें उच्चारसौकर्यास्तव लचा लोप झाला व संयुक्त व्यंजनें विभक्त होऊन

कसमण असें रूप झालें असतां क चा लोप झाला व स चा त झाला व तमण हें रूप बनतें त्याप्रमाणें येथें ल क चा लोप होऊन षचा स झाला असावा. सध्यां तेथील पर्वताचे शिख-राला आदामचें शिखर म्हणतात पण तेथील लोकांत शिख-राचें नांव समनकूट म्हणून प्रसिद्ध आहे. समन हा लक्ष्मण याचा अपभ्रंश असल्याचें लक्षांत घेतलें म्हणजे शिखराचें मूळचें नांव लक्ष्मणकूट असल्याचें दिसतें. सध्यांहि तेथें लक्ष्मणाची पूजा होत असते ( Ancient Ceylon पृ. ६६७,६६८).

## संकलन.

न्या. अय्यर यांनीं लंका नांवाचें द्वीप नसून एक नगरी होती व ती डोंगराचे शिखरावर असून भोंवतीं समुद्र होता असें आपलें मत देऊन (पृ. ७८) त्या धोरणानें स्थल निश्चय केला आहे. त्यांचे म्हणण्याचा आशय असा कीं रावणाचें निवासस्थान म्हणून उल्लेख आहे तेथें कोठें त्याला द्वीप (४।५८।२०) तर कोठें देश (४।४१।२४) म्हटलें आहे पण त्याचें नांव दिलेलें नाहीं व लंका असें नांव दिलें आहे तेथें तिला नगरी म्हटलें आहे यावरून लंका हें नांव नगरीचें होय; त्या नांवाचें द्वीप संभवत नाहीं. न्या. ची येथील शंका बरोबर आहे पण लंका हें नांव द्वीप व नगरी दोघांनाही एक असणें असंभव-नीय नाहीं; प्रांत व त्यांतील मुख्य गांव यांचीं नांवें पुष्कळ वेळां एक असतात हें आपणास माहीत आहे. द्वीप व देश

यांना नामांतर नसल्यामुळें स्पष्टपणें तें सांगितलेलें नाहीं अशी येथें संगति लावितां येते. नगरी भोंवतीं समुद्र असल्याचें वर्णन आहे व त्याविषयीं न्या. चा आक्षेप नाहीं. तेव्हां भोंवतीं असलेल्या समुद्राचे वेढ्या निमित्त नगरीलाच द्वीप म्हटलें नसेल कशावरून ? द्वीप या अर्थी लंका हा शब्द कित्येक वेळां योजण्यांत येत असल्याचें न्या. नीं लिहिलें आहे (पृ. १२) व तें खरें आहे; पण विचार केला तर या समजुतीचे मुळाशीं लंकाद्वीपच कारण आहे व हें लक्षांत घेतल्यास द्वीपाचें नांव वेगळें होतें अशी कल्पना करण्याचें कारण राहणार नाहीं.

पर्वत व नद्या यांप्रमाणें त्या त्या प्रदेशांत विशेषें करून होणाऱ्या वृक्षांचें महत्व येथें विचारांत घेणें अवश्य आहे. सेतुबंधाचे वेळीं वानरांनीं त्याकरितां अरण्यांतून जे नानाविध वृक्ष तोडून आणिले त्यांत "नारिकेला"चा (६।१२।५७) निर्देश आहे. नारळीचीं झाडें समुद्रतीरीं विशेष होतात व दक्षिणेकडील प्रवासांत तेथील त्यांचे वैपुल्याचा अनुभव सर्वांला येतो. सेतूकरितां वानरांनीं वृक्ष आणिले म्हणजे ते हजारों असणार हें उघड आहे. तेथील प्रदेशांत नारळी विपुल असतील तर त्या तोडून आणितां येतील हें सांगावयास नको. रावण मारीचाकडे सीतापहरणाचे कामीं साहाय्य मागण्याकरितां आला त्याचे प्रवासवर्णनांत समुद्रतीर नारळींनीं शोभिवंत दिसत असल्याचें सांगितलें आहे (सशैलं सागरानूपं ३।३५।११ नारिकेलोपशोभितम्–१३) रामाचे पूर्वीचे प्रवास-वर्णनांत नारळीचा निर्देश कोठें दिसत नाहीं. नारळीच्या

योगानें तो प्रदेश शोभिवंत दिसत असल्याचे या वर्णनावरून त्या प्रदेशांतील नारळीचें वैपुल्य दिसून येतें. दमोह जिल्ह्यांत याप्रमाणें नारळीचीं मोटीं वनें असतील असें वाटत नाहीं.

राम वानरसेनेसह पंपेहून समुद्राकडे निघाल्या वेळीं त्यांना वाटेंत प्रथम सह्य व मग मलय लागला. मलयाची चंदनाविषयीं प्रसिद्धि आहे व तदनुसार तेथें आल्यावर चंदनशीतल वायूचा अनुभव त्यांना मिळाल्याचें वर्णन आहे (६।४।७७) दमोह जिल्ह्यांत चंदनाचे वृक्ष आहेत काय व होतात काय ? व दूरपर्यंत सुगंधी वारा सुटण्याइतके ते तेथें विपुल आहेत काय ? हे प्रश्न येथें विचार करण्यासारखे आहेत. त्यांविषयीं निश्चित माहिती आम्हांला नसली तरी तेथें चंदनाचीं वनें असतील असें वाटत नाहीं. मलयपर्वत तर तेथें नाहीं हें निश्चित होय.

लेखांक ६ वा.

# सिंहलद्वीप हीच लंका.

न्या० अय्यर यांचे प्रबंधाचें परीक्षण येथपर्यंत तीन प्रकारांनीं केलें आहे. लंकेविषयींच्या लौकिक समजुतीवरील न्या० च्या आक्षेपांचें निरसन केल्यावर व त्यांची नवीन कल्पना निराधार ठरल्यावर सध्यांचें सिंहलद्वीप हीच रावणाची लंका असल्याविषयींची आपली समजूत बरोबर असें म्हणण्यास वास्तविक अडचण नाहीं. तथापि धार्मिक वाचकांचें एवढ्यावर समाधान होईल असा भरंवसा नाहीं. कारण आक्षेप निरसन करण्याचे प्रयत्नानें जें कांहीं सिद्ध झालें तें इतकेंच कीं रावणाची लंका दक्षिणोदधीचे पार होती. हिंदुस्थानचे दक्षिणेला जसें सिंहलद्वीप आहे तशीं मालदीव जावा वगैरे द्वीपें आहेत. त्यांपैकीं कोणती तरी लंका असली अथवा कोणी म्हटली तर त्याची शंका या प्रयत्नानें निरसन होणार नाहीं. सध्यांचें सीलोन हीच प्राचीन लंका अशी तर लौकिक समजूत आहे. तेव्हां या समजुतीला आधार काय? व या द्वीपालाच पुढें दोन नामांतरें प्राप्त झालीं असें कशावरून समजावयाचें या विषयीं विचार करून हा विषय पुरा करूं.

## महाभारताचा आधार.

महाभारतांत युधिष्ठिराचे राजसूयाचे वेळीं सहदेवानें

केलेल्या दिग्विजयांत (२।३२) हा विषय आला आहे. ताम्रपर्णी नदी ओलांडून सहदेव पुढें गेला व कन्यातीर्थी आला व याप्रमाणें दक्षिणेकडील सर्व प्रदेश जिंकल्यावर तो समुद्राचे उत्तरतीरीं आला असें वर्णन करून लंकेंत जाण्याकरितां घटोत्कचाला पाठविल्याचें सांगितलें आहे. सहदेवाचे आज्ञेवरून याप्रमाणें निघालेला घटोत्कच थेट दक्षिणेला समुद्राचे पलीकडे गेला व त्याला लंका दिसली असें येथें वर्णन केलेलें आहे. यांतील ताम्रपर्णी नदी दक्षिणेंत प्रसिद्ध आहे. कन्यातीर्थ म्हणजे कुमारीचें स्थान होय. येथून थेट दक्षिणेकडे गेल्यावर समुद्राचे पार सिंहलद्वीप येत असून त्यालाच मूळांत लंका म्हटल्याचें दिसून येतें. म्हणजे पांडवकालीं सिंहलद्वीप हीच रावणाची लंका अशी समजूत होती असें उघड होतें. महाभारतांत प्रक्षिप्त भाग पुष्कळ स्थलीं असला तरी हा कथाभाग पांडवांचे राजसूयाचे कथेसंबंधेचा असल्यानें मूळकथेशीं निगडीत आहे व यासाठीं तो प्रक्षिप्त असण्याचा संभव नाहीं. प्रक्षिप्त भाग सुद्धां सध्यां उपलब्ध असलेली महाभारताची प्रतहि शक पूर्व ५०० वर्षांच्याहून अलीकडची नव्हे हें निर्विवाद आहे (गी. र. पृ० ५५८) तेव्हां वरील भाग प्रक्षिप्त ठरला तरी त्याचा काल शकपूर्व ५०० हून अलीकडचा ठरावयाचा नाहीं. अर्थात् या कालापर्यंत या बेटाचें नांव लंका होतें असें सिद्ध होत आहे. सिंहलद्वीप असें याचें नामांतर त्यावेळीं नव्हतें असें यावरून म्हणतां येणार नाहीं हें येथें सुचवून ठेवणें अवश्य आहे.

कारण तें नांवहि प्राचीन आहे व त्याचा शोध गुणाढ्याचे कालापर्यंत त्या.नीं आणून ठेविला आहे. लंकेच्या प्राचीनत्वाविषयीं त्या. नां शंका नसून त्या नांवानें सध्याचें सिंहलद्वीप घ्यावयाचें किंवा नाहीं ? अशी त्यांची शंका आहे व महाभारतांतील वरील कथेवरून लंका या नांवानें सिंहलद्वीप श. पू. ५०० वर्षांपर्यंत विवक्षित असल्याचें सिद्ध झालें आहे.

## " सीलोन " ची व्युत्पत्ति

आतां त्याचीं तीन नांवें सीलोन, सिंहलद्वीप व ताम्रपर्णी यांविषयीं विचार करूं. आरबी ग्रंथांत या द्वीपाचें नांव सीलन असें आढळतें. हें नांव त्यांनीं कशावरून दिलें हें कळण्यास मार्ग नाहीं. सिंहलचीं–सिंघल–सेंगल अशीं अपभ्रष्ट रूपें आढळतात. सिंगलचे उच्चारदोष वाढतां वाढतां सीलन असा प्रयोग झाला असावा अशी कल्पना आहे; तथापि तिला ग्रंथगत आधार नाहीं. मात्र आरबी लोकांचे सीलन या प्रयोगाचें प्रचलित सीलोन हें अपभ्रष्ट रूप होय हें निर्विवाद आहे.

## सिंहलद्वीप व ताम्रपर्णी

सिंहलद्वीप व ताम्रपर्णी या दोन नांवासंबंधानें बौद्ध ग्रंथात आख्यायिका आहे. वंग देशाची वंग या नांवाची राजधानी असून तेथें एक राजा होता. कलिंग राजाचे कन्येशी त्याचा

विवाह झाला. तिला पुत्र व कन्या अशीं दोन अपत्ये होती. मुलाचें नांव सिंहबाहु व मुलीचें सिंहसिवली. कांहीं दिवसांनीं राज्यत्याग करून ती मुलांसह लाळरद्र्याच्या अरण्यांत जाऊन राहिली. तेथें तिनें एक सिंह बाळगला होता. पुढें ती मुलांसह परत वंगपुरीला आली. तिचा पुत्र सिंहबाहु यानें त्या सिंहाला मारिलें व त्या निमित्त त्याला राज्यपद देण्यांत आलें. तथापि तो गादीवर बसला नाहीं व त्यानें सर्व राज्य परत पित्याचे स्वाधीन केलें. नंतर आपल्या बहिणीला घेऊन तो परत पूर्वीच्या अरण्यांत गेला व तेथें त्यानें सिंहपुर म्हणून नवीन नगर वसविलें व तेथें राज्य करूं लागला. या सिंहबाहूचे विजय नांवाचे ज्येष्ठ पुत्रानें लंकेंत जाऊन तेथें आपलें राज्य स्थापिलें. त्यानें त्या द्वीपाचें नांव ताम्रपर्णी असें ठेविलें. सिंहाला मारल्या निमित्त त्या राजाला सिंहल असें नांव प्राप्त झालें होतें. त्याचे बरोबर लंकेत जे लोक वंग देशांतून गेले त्यांना राजाचे सिंहल या नूतन पदवी निमित्त सिंहल असेंच म्हणत असत. अशी आख्यायिका महावंसोमध्यें (परिच्छेद ६ वा) सांगितलेली आहे. प्रस्तुत मुद्यासंबंधानें दीपवसोच्या ९ व्या प्रकरणाचे प्रारंभीच्या प्रास्ताविक निरूपणांत पुढील पंक्ति आहे—

लंकादीपो अयं अहु सिहेन सिहला इति

पाली भाषेंतील या पंक्तीचें शब्दशः इंग्रजी भाषांतर पुढीलप्रमाणें केलेलें आहे There was the लंकाद्वीप (inhabited by) the सिंहल people so called after

सिंह. म्हणजे लंकाद्वीप म्हणून एक द्वीप होतें त्यांत सिंहली लोकांनीं वसाहत केली. सिंहानिमित्त त्या लोकाला सिंहल म्हणत असत.

सिंहल या नांवाची उपपत्ति महावंसोंतील वरील आख्यायिकेंत दिली असून तें नांव प्रथम राजाला व मग त्याबरोबर लंकेंत जे लोक गेले त्यांला प्राप्त झाल्याचें यावरून उघड दिसून येत आहे. द्वीपवंसोंतील वरील अवतरणांत द्वीपाचें प्राचीन नांव लंका असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. सिंहलद्वीप या नांवाची उपपत्ति येथें सांगितली नसली तरी तें नांव सिंहली लोकांनीं येऊन वसाहत केली त्यानिमित्त त्या द्वीपाला प्राप्त झाल्याचें न सांगतां कळण्यासारखें आहे. ताम्रपर्णी नांव राजानें दिल्याचें आख्यायिकेंत सांगितलें आहे व यावरून सरकारी कागदोपत्रीं तें तेव्हां चालू झाल्याचें दिसून येतें. ग्रीक ग्रथांतून या नांवाचा जो उल्लेख आढळतो त्याचा यावरून उलगडा होतो. ग्रीकांचा संबंध येथें आला तो राजकीय क्षेत्रांत व यामुळें तें नांव त्यांचे व्यवहारांत विशेष प्रचलित होणें संभवनीय आहे. सिंहलद्वीप हें नांव लोकांनिमित्त व लोकांनीं ठेवलेलें यामळें त्याचा प्रसार विशेष झाला व ताम्रपर्णी हें नांव त्या राजवटीनंतर एकदां पाठीं पडलें तें तसेंच पाठीं पडलें व ऐतिहासिक होऊन राहिलें.

## "महावंसो" चा व "दीपवंसो" चा अधिकार

महावंसो व दीपवंसो या बौद्ध ग्रंथाचे आधार येथें आम्हीं

घेतले आहेत तथापि या कामीं त्यांचें प्रामाण्य कितपत मानणें योग्य आहे व आम्हीं तें किती मानिलें आहे हें येथें सांगून ठेवणें अवश्य आहे. दीपवंसो हा ग्रंथ महावंसोचे पायासारखा मानिला जातो व तितका तो त्याहून प्राचीन आहे. महावंसो हा ग्रंथ पालीभाषेंत असून बुद्धधर्मीयांचा आहे असें सामान्यपणें आपणांस माहीत आहे व यावरून त्यांत इतिहासाचा संबंध असेल असें वाटत नाहीं. सीलोनमध्यें बुद्धधर्माचा प्रसार कसा झाला याचा त्यांत वास्तविक इतिहास आहे. धर्मप्रसाराला अशोकापासून राजसत्तेचें पाठबळ मिळाल्यानें त्याचे इतिहासांत राजकीय घडामोडी क्रमप्राप्त म्हणून सहैव सांगण्यांत आल्या आहेत व यामुळें त्याला नकळत इतिहासाचें स्वरूप प्राप्त आलें आहे. या स्वरूपास अनुसरून महावंसोला सीलोनचें Great Chronical व चूळ वंसोला Little Chronical असें संशोधकांमध्यें म्हणण्याचा परिपाठ आहे. महावंसोमध्यें खि. पू. ५४४ म्हणजे बुद्धाचे जन्मापासून तो इ. स. ३६२ पर्यंतचा इतिहास आला आहे व यापुढील अठराव्या शतकापर्यंतचा इतिहास चूलवंसोमध्यें आला आहे. महावंसोचा काल निश्चित कळत नसला तरी ज्या कालापर्यंतचा इतिहास त्यांत आलेला आहे त्याहून त्याचा काल फार दूरचा संभवत नाहीं. त्यावेळीं लोकांत प्रसृत असलेल्या आख्यायिका व मिळाली ती माहिती लेखकानें त्यात संकलित करून सांगितली आहे. बुद्धाचे निर्वाणानंतर अशोकानें धर्मप्रसाराचें काम हातीं घेतलें त्यावेळीं लंकेंत महींद्र

वगैरे प्रचारक गेल्याचें वर्णन दीपवंसो* व महावंसो या दोनहि ग्रंथांत आलेलें आहे व त्याला पोषक असे कोरींव लेख सांपडले आहेत व यावरून त्यांमधील कित्येक वर्णनें काव्यमय व अत्युक्तिपूर्ण असलीं तरी त्यांतील इतिहास तात्पर्यार्थानें घेणें अयुक्त होणार नाहीं हें उघड आहे. सीलोनचें लंका हें प्राचीन नांव असून तेथें बुद्धपूर्वकालीं बंगालमधून सिंहली लोक येऊन

---

टीपः–दीपवंसोचा काल निश्चित कळत नसल्यानें त्या विषयीं कांहीं लिहितां आलें नाहीं; परंतु हा लेखांक लिहून झाल्यानंतर त्या विषयीं माहिती कळल्यावरून ती येथें नोंदून ठेवणें अवश्य आहे. विनय पिटक या बौद्ध ग्रंथावर बुद्ध घोषाची टीका असून त्या टीकेंत दीपवंसोंतील दोन श्लोकांचीं अवतरणें घेतलेलीं आहेत (दी. वं. ११।१-१६ व १२।१-४) बुद्धघोष हा पांचव्या शतकाचे पूर्वार्धांत होऊन गेला. अर्थात् दीपवंसोचा लेखन काल चौथ्या शतकाचे उत्तरार्धाहून अलीकडील नव्हे हें निश्चित होय. दीपवंसोमध्यें वरीलप्रमाणें सिंहल द्वीपाचा इतिहास असून त्यांत त्या द्वीपाचें पूर्वीचें नांव लंका असल्याचें सांगून त्याला मागाहून सिंहलद्वीप हें नांव मिळाल्याचें सूचित केलें आहे हें विशेष होय. चौथ्या शतकांत या द्वीपाविषयीं लोकांमध्यें जी माहिती प्रचलित होती तिचा संग्रह यांत लेखकानें केला आहे हें सांगावयास नको. सिंहलद्वीपाची प्राचीनता इ. पू. कांहीं शतकें गेली तरी लंका हें त्या द्वीपाचें त्याहून प्राचीन नांव असल्याचें यावरून सिद्ध होत आहे. न्या. नीं लंका या नांवाची उत्पत्ति दहाव्या शतकानंतर कल्पिली असून दीपवंसोचा आधार त्याचे अगदीं उलट आहे.

राहिले व त्यावेळीं त्याला सिंहलद्वीप व ताम्रपर्णी हीं नांवें नव्यानें प्राप्त झालीं इतकें दाखविण्या पुरताच त्यांचा आधार आम्हीं येथें घेतला आहे. लंकेंत गेलेल्या प्रचारकाचें नांव चिनी प्रवासी ह्यू एन्त्संग याचे प्रवास वर्णनांत महींद असेंच आढळतें. ब्रिटिश एंपायर सीरीज मधील सीलोनच्या वर्णनांत खि. पू. ६०० वर्षांचे सुमारास सिंहली लोक बंगाल मधून आले असल्याचें सांगितलें आहे तेंहि वरील ग्रंथ तात्पर्यार्थानें प्रमाण मानून होय. तेथें असें स्पष्ट सांगितलें नसलें तरी सर्व शोधकांला आधार दुसरा नसल्यानें तें न सांगतां कळण्यासारखें आहे. सीलोनमध्यें सिंहली लोकांत सध्यां प्रचलित असलेली सिंहलीभाषा व वायव्येकडील प्रदेशांतील लोकांतील भाषा यांमधील सादृश्य दाखविण्याचा प्रयत्न एका शोधकानें केला असून त्यांत त्याला यश मिळालें आहे. हें प्रमाण वरील इतिहासाला पोषकच आहे.

अशोकानें धर्मप्रसारार्थ जे प्रचारक हिंदुस्थानांत व बाहेर देशीं पाठविले त्यांत लंकेची निवड कां केली हा प्रश्न येथें विचार करण्यासारखा आहे. म्हैसूर पर्यंत त्याचे राज्याचा विस्तार होता तेव्हां म्हैसूर येथें स्वतंत्र प्रचारक पाठविणें साहजिक आहे. विजय व त्याचे सिंहली अनुयायी तेथें आधींच जाऊन राहिले होते व त्यानिमित्त त्यांची माहिती राजाला होती हें खरें; तथापि रामायणांतील कथा त्यावेळीं सर्वत्र पसरली असून सीतेला रावणानें जेथें बंदींत ठेविली व जेथून रावणाचा वध करून रामांनीं तिला सोडवून आणिली तें स्थान

या नात्यानें लंकेविषयीं क्षेत्र ही भावना होती व यासाठीं तेथें स्वतंत्र धर्मप्रचारक पाठविण्याचें राजानें ठरविलें असलें पाहिजे असें दिसतें. स्वत: गौतमबुद्ध दोन तीन वेळां लंकेंत गेल्याचें कोठें कोठें लिहिलें आहे पण त्या विषयीं विश्वसनीय प्रमाण मिळत नाहीं; आणि तसें प्रमाण मिळालें तर गौतमबुद्धाची तिकडील यात्राहि रामानिमित्त लंकेला क्षेत्रत्व आल्यास्तव होय हें नाकारतां येणार नाहीं.

### " सीलोन " मधील रामायणकालचें अवशेष.

सीलोन मधील सध्याचे सिंहली रहिवासीहि आपणास तेथील मूळचे असें समजत नाहींत. मूळचे रहिवासी वडा या नांवानें प्रसिद्ध आहेत. या लोकांमधील लोकगीतें एकानें प्रसिद्ध केलीं असून त्यांत " याकु " म्हणून देवतांची स्तुति असल्याचें लिहिलें आहे. याकु हा यक्ष शब्दाचा अपभ्रंश होय. रावणानें पूर्वी हे द्वीप कुबेराकडे होतें व कुबेर हा यक्षराज म्हणून प्रसिद्ध आहे. तेव्हां यक्षाला त्या द्वीपांत देवत्व प्राप्त होणें क्रमप्राप्त दिसतें व अशा रीतीनें लोकगीतांतील याकू या देवतेचा निर्देश इतिहासाला पोषक आहे.

सीलोनमध्यें निकुंभिला देवीचें स्थान कोलंबो पासून ४० मैलांवर आहे. ( बुद्धिस्ट टेक्स्ट सोसायटीचें जर्नल वर्ष ३ भाग १ ) या देवतेचा निर्देश रामायणांत इंद्रजितानें केलेल्या यज्ञानिमित्त आलेला आहे. निकुंभिला या नांवांतील नि हा

उपसर्ग असावा व तो काढला म्हणजे कुंभिला शब्द राहतो व हें गांवाचें नांव देवते निमित्त प्राप्त होऊन त्याचा कोलंबो हा अपभ्रंश झाला असेल काय ? अशी येथें शंका येते.

सीतेच्या नांवानें सीतातलाव, सीताकुंड, सीताइला, सीतापाक अशीं कित्येक स्थलें सीलोनमध्यें सध्यांहि प्रसिद्ध आहेत. बुत्रार एलिवा येथें सीताकुंड आहे. त्याचे जवळच सीतेला रावणानें कैदेंत ठेविलें होतें असें सांगतात. सीता त्या द्वीपांत एक वर्ष होती त्याचीं हीं स्मारकेंच होत. गौतमबुद्धाचा शिष्य येथें येऊन त्यानें येथें बुद्धधर्माचा प्रसार केला व तो धर्म कालेंवरून तेथें रूढ झाला असा इतिहास आहे. अशा रीतीनें तेथें बुद्धधर्माचें वर्चस्व झाल्यावरहि हीं स्मारकें रामायणांतील नायिका जी सीता तिचे नांवानें वशीच्या तशीं राहिलीं आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## बौद्धमंदिरें व शिलालेख यांचे आधार.

सिंहलद्वीपाला लंका हें नांव चौलराजानें तें द्वीप जिंकल्या-वर (स. १००२) पुढील दीड शतकांतील काळांत पडल्याचें न्या. अय्यर यांनीं ठरविलें आहे. सिंहली राजा पराक्रमबाहु यानें आपलें स्वातंत्र्य बाराव्या शतकाचे उत्तरार्धांत परत मिळविलें. या राजानें तेथें जीं अनेक मंदिरें बांधलीं आहेत त्यांची माहिती चूलवंसो मध्यें आली आहे. हीं सर्व मंदिरें सध्यां आहेत असें नाहीं. बहुतेक उध्वस्त झालीं आहेत. त्यांपैकीं एक मंदिर "लंकातिलक" म्हणून चूलवंसोमध्यें

सांगितलें असून तें अजूनहि त्या नांवानें प्रसिद्ध आहे. सीलोन मधील सर्वांत मोठें मंदिर म्हणून त्याचें वर्णन Every body's book of facts (पृ. १६७) यांत केलें आहे. त्या. चे मताप्रमाणें पाहिलें तर सिंहलद्वीपाला लंका हें नांव त्यावेळीं नुकतेंच मिळालें व तेंहि सिंहलीच्या शत्रूंनीं उपहासबुद्धीनें दिलेलें; पराक्रमबाहूनें तर सिंहलीचें स्वातंत्र्य परत मिळविलेलें; अशा स्थितींत तो आपण नवें मंदिर बांधून त्याला असलें उपहासगर्भित नांव देईल हें संभवनीय आहे काय ! पूर्वापार चालत आलेलें म्हणून व रामांनीं सीतेला सोडविली त्या प्रमाणें आपण तिला सोडविली या भावनेनें त्यानें लंका हें नांव मंदिराचें नामकरण करितांना त्यांत समाविष्ट केलें असलें पाहिजे असा तर्क येथें अधिक संयुक्तिक व स्वाभाविक दिसतो.

या पराक्रमबाहूचा एक शिलालेख देवनागरी लिपींतील मिळाला असून त्यांत त्यानें लंका आपण जिंकून आपल्या राज्यास जोडल्याचें स्पष्ट म्हटलें आहे. ( H. C. P. Bell, Report on the Kegalla District पृ. ७५ ) येथें तर लंका या नांवाविषयींचा त्याचा अभिमान व्यक्त होत आहे. लंका हें शत्रूनें उपहासानें दिलेलें नांव असेल तर त्याविषयीं असा अभिमान स्वभावतः कोणाला तरी वाटेल काय ?

सिंहली राजा कश्यप ५ वा ( सन ९०८ ते ९१८ ) यानें अनुराधपुर येथील एका बौद्धविहाराचा जीर्णोद्धार केल्याचें वर्णन चूलवंशोमध्यें आलें आहे. तेथें संध्यां एक शिलालेख मिळाला आहे तो असावा तितका सुवाच्य नाहीं तथापि या

जीर्णोद्धारापुरती माहिती त्यांत मिळते व अशा रीतीनें त्या राजानें त्या विहाराचा जीर्णोद्धार केला असें निश्चित होतें. या विहाराचें नांव त्यांत मारीचवट्टी विहार असें सांगितलेलें आहे. जीर्णोद्धार केल्याचें सांगितलें आहे त्यारून व तो जीर्णोद्धार प्रथमचा असें धरिलें तरी त्याची स्थापना आरंभीं झाली तरी त्यापूर्वी सुमारें दोनशें वर्षें म्हणजे आंठव्या* शतकांत झाली असली पाहिजे असें अनुमान करणें अयुक्त होणार नाहीं. त्याचे नांवावरून तो मारीचवट्टी

---

* टीप—मारीच वट्टी विहाराचे जीर्णोद्धाराचे काळावरून तो विहार प्रथम बांधल्याचा काळ आम्हीं वर अनुमानानें लिहिला आहे; पण हा विहार प्रथम बांधल्याची माहिती मागाहून मिळाली ती येथें नमूद करून ठेवितों. हा विहार सिंहली राजा दुतगामनी यानें बांधल्याचें महावंसोमध्यें सांगितलें आहे. हा राजा इ. पू. ७७ मध्यें मरण पावला. त्यानें २४ वर्षें राज्य केलें. अर्थात् इ. पू. १०१ ते इ. पू. ७७ पर्यंतच्या कालांत त्यानें केव्हां तरी हा बांधिला यांत शंका नाहीं. यांत लंका या नांवाचा संबंध दिसत नसला तरी मारीच या नांवाचा जो लंकेशीं संबंध रामायणावरून प्रतीत होतो तो त्यावेळीं तिला सिंहलद्वीप हें नांव मिळाल्यावरहि अबाधित राहिला होता असें दिसून येतें. अन्यथा न्दा० चे कल्पने प्रमाणें त्यावेळीं द्वीपाला लंका हें नांव नसल्यावर त्यांतील एकाद्या वाडीला मारीचाचें नांव मिळण्याचा संभव तरी कसला ?

म्हणून अनुराधपुरांतील एका वाडींतील विहार दिसतो. मारीच हें रावणाचे मातुळाचें नांव; त्यानें मायेनें मृगरूप धारण करून रावणाला सीतेचा अपहार करण्याचे कामीं साहाय्य केल्याची कथा रामायणांत प्रसिद्ध आहे. तेव्हां त्याचे नांवानें ही वाडी असावी असें नांवावरून दिसतें. सिंहलद्वीपाला लंका नांव मिळण्याचा जो काळ न्या. अय्यर यांनीं ठरविला आहे त्यापूर्वी कांहीं शतकें हें नांव तेथें प्रचलित असल्यानें त्या प्रदेशाचा रावणाशीं घनिष्ठ संबंध सूचित होत असून त्यावरून तो प्रदेश म्हणजे रावणाची लंका असें निश्चित होतें.

गौतमबुद्धाचे दांतावर सुंदर व भव्य मंदिर बांधणारा सिंहली राजा विजयबहु याचा एक शिलालेख अंबगमुर येथें मिळाला आहे. त्यांत त्यानें तामीलांचे सैन्याचा विध्वंस करून लंकेचें सर्व राज्य आपल्या एकसत्तेखालीं आणल्याचें सांगितलें आहे. या राजाचा निश्चितकाल प्रस्तुत कांहीं आधार नसल्यामुळें लिहितां येत नाहीं; तथापि तो दहाव्या शतकापेक्षां अर्वाचीन नव्हे इतकें येथें सांगून टाकितों.

वरील सर्व विवेचनावरून सीलोनचें सिंहलद्वीप हें नांव प्राचीन नसून लंका हें प्राचीन नांव होतें व सिंहली लोक तेथें येऊन राहिल्यावर त्यानिमित्त त्याला सिंहलद्वीप म्हणूं लागले असें स्पष्ट होत आहे. सिंहलद्वीपाची लंका झाल्याची न्या. अय्यर यांची कल्पना निराधार आहे व यासाठीं रावणाचे लंकेचा शोध अन्यत्र करावयास नको हें उघड आहे.

## समारोप

न्या. अय्यर यांच्या प्रबंधांतील मुख्य विषय-रावणाचे लंकेचा स्थलनिश्चय—याविषयीं त्यांनीं केलेल्या प्रतिपादनाचें येथपर्यंत परीक्षण केलें; कांहीं आनुषंगिक विषय त्यामध्यें आले आहेत तथापि त्याविषयीं साधक अथवा बाधक आम्हीं कांहीं लिहिलें नाहीं व हें परीक्षण मर्यादेबाहेर लांबत गेल्यामुळें व विषयाचे महत्वास्तव इतका विस्तार अपरिहार्य झाल्यामुळें त्या विषयीं लिहून तें अधिक वाढवावें असें आमची मनोदेवता सांगत नाहीं. नाहीं तर रामायणांतील विरोध म्हणजे जनास्थानांतील सुपीक भूमीसाठीं झालेला दोन समाजाचा झगडा होय, असा त्यांनीं शोध लाविला आहे; तसेंच मध्यहिंदुस्थानांत सध्यां असलेल्या रानटी जाती व रामायण काळचे राक्षस यांचे चालीरीतींतील सादृश्य दाखवून राक्षसांची वस्ती प्राचीन कालीं तेथें होती व सध्यांच्या रानटी जाती त्यांचे वंशांतील ठरवून रावणाची लंका मध्यहिंदुस्थानांत असल्याच्या आपल्या कल्पनेला पुष्टि आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे; अशीं आणखीहि कांहीं विधानें आहेत या विषयीं लिहिण्यासारखें आहे; तथापि मुख्य विषय हातावेगळा झाला असल्यामुळें त्यांच्या वरीलसारख्या विधानाला तादृश महत्व राहात नाहीं हें वाचकांला सहज कळण्यासारखें आहे.

एक सूचना मात्र येथें अवश्य म्हणून करितों कीं अशा प्रबंधाला विषयवार सूची असली पाहिजे व ती नसल्यामुळें

परीक्षण लिहितेवेळीं पदोपदीं फार अडचण पडली तरी यापुढें न्या. अय्यर जे प्रबंध लिहिणार आहेत त्यांत त्यांनीं ही सुधारणा अवश्य घडवून आणावी.

शेवटीं न्या. अय्यर यांच्या प्रबंधाचे परीक्षणाचे निमित्तानें रामलक्ष्मणादिकांबरोबर लंकेपर्यंत जाऊन अयोध्येला येण्याचा मानसिक सुखसोहळा भोगण्याचा योग लाभला याबद्दल न्या. चे मनःपूर्वक आभार मानून फार लांबलेलें हें परीक्षण पुरें करितों !*

---

*टीप–बौद्ध वाङ्मय व शिलालेख या संबंधाची या लेखांकांतील माहिती बहुतेक " इंडियन हिस्टॉरिकल्स क्वॉर्टर्ली " या त्रैमासिकांतील निरनिराळ्या लेखांतून संकलित करून दिलेली आहे.

